नामदार कन्हय्यालाल मुनशी कृत

# काकाची शशी

तीन अंकी नाटक

अनुवादिका—माई वरेरकर.

ता. ३१ आक्टोबर १९३७ रोजीं बॉम्बे थिएटरांत प्रभात सं
मंडळी करवीं या नाटकाचा पहिला प्रयोग करून घेण्यांत आला. त्यां
खालील नटनटींनीं यांत कामें केलीं:--



| | | |
|---|---|---|
| शशिकला | ... | मंजिरी |
| शिवगौरी | ... | सुशीला |
| विधुमुखी | ... | प्रभावती |
| गंगाबेन | ... | सरस्वती |
| पिरोजा | ... | भाई कुळकर्णी |
| मनहरलाल | ... | मास्टर दत्ताराम |
| कुंदनलाल | ... | बाबूराव तिरोडकर |
| इंद्रजीत | ... | नाना आठवले |
| गौरीशंकर | ... | नारायण जोगळेकर |
| मोतीराम | ... | विनायक देशपांडे |
| वल्लभराम | | मांजरेकर |
| दुर्लभराम | | टिपणीस |
| गुलाबदास | | सोनवणे |

# प्रस्तावना

गुजराती वाङ्मयांतील ग्रंथांचे मराठी अनुवाद क्वचितच झाले आहेत. कै. काशीनाथ रघुनाथ मित्र यांनीं अनुवादिलेली 'रमा आणि माधव' ही बालावृद्धविवाहावरची कादंबरी (मराठींतील शारदा नाटकाला आधारभूत झाल्याचा भास होणारी) ही पहिली कादंबरी असावी.

पण गुजरातींतील कोणतेंच नाटक अजून मराठींत आलें नव्हतें, 'काकांची शशी' हें नाटक तीन वर्षांपूर्वी हौशी रंगभूमीवर येण्यासाठीं अनुवाद करायला मी हातीं घेतलें होतें. पण त्या वेळचा योग आज फलद्रूप होत आहे. नामदार कन्हय्यालाल मुनशी यांनीं हें नाटक अनुवादित करण्याची मला परवानगी दिली याबद्दल मी त्यांची फार आभारी आहे.

अनुवाद करण्याच्या कामीं 'गुणसुंदरी'चे संपादक श्री. यशेश शुक्ल यांचें सहाय्य झालें नसतें तर हें काम मला फारच कठीण गेलें असतें. 'जन्मभूमि' दैनिकावरील काम—संभाळून त्यांनीं मला जी मदत केली त्याबद्दल मी त्यांची फार आभारी आहे.

प्रसिद्ध गायनशास्त्रज्ञ श्री. बलवंतसिंग हुगन यांनीं या नाटकासाठी आधुनिक संगीताची योजना करण्याकरतां जे निरपेक्ष प्रयत्न केले आणि त्यामुळें नाटकाला जी शोभा आणली त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. यांतील पदें माझ्या वडिलांनीं केलीं आहेत.

हें पुस्तक प्रसिद्ध करण्याच्या कामीं मौज प्रेसचे मालक श्री. भागवत यांनीं जे परोपरीनें सहाय्य केलें त्याबद्दल मी सदोदित त्यांची ऋणाइत राहील.

हाजीकासमवाडी
मुंबई, ७

माई वरेरकर,

# काकाची शशी

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

( **वेळ:**—संध्याकाळीं ३॥ वाजतां- )

[ **स्थळ:**—मुंबई, सॅन्डहर्स्ट रोडवर राहाणाऱ्या रा. सा. मोतीराम डेप्युटी सुपरिंटेंडेच्या भाडोत्री घराचा एक दिवाणखाना दिवाणखान्यांतील फर्नीचर-मधें एक गालीचा, ड्रेसिंग टेबल, दोन लेदरक्लॉथनें मढवलेले सोफे, तशाच चार खुर्च्या, दोन आराम खुर्च्या, कांचेच्या केसमधें एक हार्मोनियम, भिंतीवर कुटुंबातील माणसांचे लहानमोठे फोटो, खिडकीवर पंचम जॉर्जचा फोटो. कमींत कमी ५०० ते १००० रुपये पर्यंत कमावणाऱ्या सुशिक्षित गुजराती गृहस्थाचा दिवाणखाना. फर्नीचरवरलि हाती विणलेले रुमाल शिवगौरी ठाकठीक करीत आहे. जवळजवळ अठ्ठावीस वर्षे वयाची जाडीजुडी गुजराती स्त्री. मोठे डोळे, मोठे कुंकू, जाड वेणीचा शेपटा, मोठे गाल, अतिशय फिक्या रंगाचें पातळ, हिरव्या रंगाचा ब्लाऊझ आणि पांढरे सफेत चप्पल; लांबवर पाय टाकणें, ठस-क्यांत चालणें वगैरेवरून तिच्या व्यक्तीत्वाची छाप पडते. तिला एक कागदाचा तुकडा सांपडतो, तो घेऊन चुरगाळून श्रीकृष्णाच्या सुदर्शन चक्राप्रमाणें खिडकीबाहेर दिसणाऱ्या टेलिफोनच्या दिशेला भिरकावून देते. ]

**शिवगौरी:**—रामा-रामा—

[ मोतीराम प्रवेश करतो उंच, धिप्पाड, सफेत ड्रीलच्या कपड्यांत सज्ज असलेला पोलिस अंमलदार, कैसरप्रमाणें राखेलल्या मिशांवर वारंवार हात फिरवण्याची लकब, चोहींकडे बेदरकारपणें पाहात राहण्याची ढब. ]

**मोतीराम:**—काय आहे शिवगौरी ?

**शिवगौरी**—( रुमाल नीट करीत असतां ) तुला कुणी बोलावलं ?—रामा !

**मोतीराम**—शिवगौरी, मला तो गध्धा भेटला होता.

**शिवगौरी**—( एकदम सोफ्यावर बसकण घेऊन पायावर हात आपटते. ) भोग कांहीं सुटत नाहीं माझा ! तुलाही त्याच्याशिवाय चालत नाहीं ना ! हं ! सांग, काय आहे ?

**मोतीराम:**—रागावतेस कशाला ?

**शिवगौरी:**—रागावूं नको तर काय करूं ? ( सुस्कारा टाकते ) माझा काय जीव आहे ? हा काळतोंड्या माझा पिच्छाच पुरवतोय ! (पातळ सावरीत) स्वस्थ कशी बसूं मी ? एक तर माझी ही प्रकृती अशी आणि त्यांत—हं काय झालं—सांग ना ?

**मोतीराम:**—( आढ्यतेनें ) तो हरामखोर कुणाच्याशा मोटार मधून जात होता. लगेच मी मोटारचा नंबर टिपून घेतला.

**शिवगौरी:**—( चिडून ) सगळ्या गांवाचा दिवस उगवेल. पण माझा केव्हां उगवणार ? ( जसा कांहीं गालींच्याखालींच सूर्य लपला आहे अशा नजरेने तिकडे डोळे वटारून पहाते. )

**मोतीराम:**—त्याचा एक नातेवाईक माझ्याजवळ म्हणत होता, कीं तो म्हणतो, याबाबतींत सुखसमाधानानं कांहीं तरी करूं.

**शिवगौरी:**—समाधान ! समाधान ! ( जोरानें डोळे चोळून ) भावाच्या घरी अन्न खातें आहें तिथंही हे स्वस्थ बसूं देत नाहींत ! यांचं काय घोडं मारलं आहे मी कोण जाणे ! मरोत ते माझे आईबाप ! शिकवून सवरून मला या खाईत ढकललं.

**मोतीराम:**—तूं कां चिडतेस ? आई नि बाप केव्हांच मेले—

**शिवगौरी:**—हं ! म्हणूनच माझी ही दशा ना ! उद्या तुझं लग्न झालं म्हणजे कोण आहे माझं ? ( डोळे पुशीत, सद्गदित होऊन ) कुणी कालची पोर भावजय म्हणून आली म्हणजे तिची सेवाचाकरी करून मला दिवस काढावे लागणार.

**मोतीराम:**—( शरमून ) ह्या आज पांच वर्षे झाली—

**शिवगौरीः**—हो—भाई—हो—पांच वर्षे झालीं-लग्न नाहीं केलंस माझ्या बाबा-माझ्यावर उपकार केलेस बरं ! देवा देवा—( ओरडून ) जळो हा हिंदूंचा संसार ! स्त्री बिचारी निराधार करून टाकली आहे यानं ! ( संतापून ) कवडी कमावण्याची ताकद नाहीं आमच्यांत म्हणूनच ना तुमचे उपकार घ्यावे लागतात ?

**मोतीरामः**—पण ताई—

**शिवगौरीः**—ताई आणि भाई-सगळं सांगायला ! आम्हांला जरा बाहेर तर पडूं द्या म्हणजे पहा काय होतं तें. शिकवून सवरून मला नाडलंत ! मी तें कसं विसरेन ?

**मोतीरामः**—माझी जायची वेळ झाली. जातों हं.

**शिवगौरीः**—जा बाबा जा. खुशाल जा. वहिनी घरांत असती म्हणजे दाखवलं असतं तिनं घर उघडं टाकून कसा जातोस तें !

**मोतीरामः**—आज कुणी येणार आहे वाटतं घरीं ?

**शिवगौरीः**—आमच्या स्त्री समानता संघ कमिटीच्या सभासदांना चहाला बोलावलं आहे. काळबादेवीला जात असलास तर लुडोविचीचं Woman-a Vindication पाठवून द्यायला सांग. ( डोळे चढवून ) तो तुझा फार आवडता ऑथर आहे ! नाहीं ?

**मोतीरामः**—हां-हां-मी आतांच स्टेशनवरून फोन करीन. (घंटा वाजते)

**शिवगौरीः**—माझ्या मैत्रिणी आल्या वाटतं-तूं जा आतां.

**मोतीरामः**—मी जातोंच-पण कशा काय आहेत या तुझ्या मैत्रिणी !

**शिवगौरीः**—झालं-पुरुषांचं हेंच-स्त्री दिसली कीं झाले उल्लु ! ( डोक्यावर हात घेऊन ) अरेरे-तुमच्या जातीपुढं हात टेकले.

[ सौ. विधुमुखी कुंदनलाल प्रवेश करते. ती पंचवीस वर्षांची स्वरूपसुंदर स्त्री आहे. धीरगंभीर चाल. एकंदरींत उदासीन. ]

**विधुमुखीः**—( हंसत ) शिवगौरी आहेत का घरांत ?

**शिवगौरीः**—( हंसत हंसत ) या.

**मोतीराम**:—विधुबेन–कसं काय ?

**विधु**:—( हंसत ) कसं काय मोतीरामभाई ? तुम्ही बरेच दिवसांत आमच्या घरीं आला नाहींत ? वाः !

**मोतीराम**:–येईन हो, पण माझी नोकरी ही अशी ! बरं, कुंदनलाल कसे काय आहेत ?

**विधु**:–( खिन्नपणें हंसून ) ठीक आहेत ! तुम्हां पुरुषांना थोडंच घर चालवायचं असतं, कीं मुलांची निगा ठेवायची असते, म्हणून जीव कंटाळेल.

**मोतीराम**:—चला–मी रजा घेतों. शिवगौरी, मी एका तासाभऱ्यांत परत येतो हं. ( जातो )

**शिवगौरी**:—( हंसत ) विधुबेन, बसा ना ! आतां असं पहा, आपल्या संघानं चर्चा तर पुष्कळ केली. आतां आपल्याला कांहीं कार्य करून दाखवायचं आहे कीं नाहीं ?

**विधु**:—काय कार्य दाखवायचं करून बाई ? सांगा, गुजराती स्त्रिया जात्याच थंड आणि कांहीं करण्याची हिंमतही नाहीं. सगळ्या चर्चा करतील–नि घरीं गेल्या कीं पुन्हां आपलं मागील अंकावरून पुढं चालू. जोपर्यंत पुरुषांच्या टाळक्यांत हाणलं नाहीं तोपर्यंत— ( घंटा वाजते. विधु फिक्की पडते. ) मला वाटतं, शशिकला आली !

**शिवगौरी**:—यंदाच बी. ए. झाली नाहीं ती ?

**विधु**:—हो.

**शिवगौरी**:—तिच्या काकांना दोन चार वेळां भेटलें पण ती नव्हती भेटली कधीं. आपल्या संघाची सभासद झाली म्हणूनच आज तिला बोलावलं आहे. ती फार तिखट आहे म्हणतात !

**विधु**:—( केविलवाणें हंसून ) असं म्हणतात खरं सारे !

**शिवगौरी**:—तिचे काका फार श्रीमंत आहेत नाहीं ?

**विधु**:—हो. आमचे अशील आहेत ते. फार चांगला माणूस पण स्त्रीशत्रू आहे. आमचं तोंड पाहायलासुद्धां तयार नाहीं.

**शिवगौरी**:—सध्यां आपल्याला शशीकलेची जरूर आहे !

[ शशिकला प्रवेश करते. देखणी, मोहक हास्य, तरतरीत, वीस वर्षांची तरुणी. तिनें उंची कपडे पेहेरलेले.

**शशिकला**:—( उत्साहानें ) काय विधुबेन, कसं काय ? ठीक ? काय शिवगौरीबेन ?

**शिवगौरी**:—या—बसा—( शशिकला बसते ) शशिबेन, आम्ही आपल्या स्त्रियांच्या परिस्थितीसंबंधीं बोलत होतों. आम्ही नुसती चर्चाच करीत आहों आणि पुरुषांची निर्दयता, स्वार्थीपणा नि जुलूमशाही तशीच चालू आहे !

**विधु**:—( थोड्या कटाक्षानें ) शशिबेनना काय वाटतं ? त्यांचं लग्न नाहीं झालं पण त्यांना पुरुषांचा चांगला अनुभव आहे !

**शशी**:—( गौरवानें ) होय तर ! एक तर माझे काका स्त्रीशत्रू आहेत. आणि इतरांनाही मी चांगली ओळखतें. या शिकल्या—सवरलेल्या स्त्रिया लग्न करून कां मरून जातात हेंच मला समजत नाहीं.

**विधु**:—( कटाक्षानें ) हं:—नाहीं लग्न केलं तोपर्यंत.

**शिवगौरी**:—( प्रशंसापूर्वक ) मलाही तेंच पटत नाहीं. आमच्यासारख्या—ज्यांचं लहानपणींच दुर्दैव उभं राहिलं—अशांची गोष्ट सोडा. पण ती मधुरी—काल तर ती आपल्या कामिटींत होती—नि आतां राजीनामा देऊन लग्न करून घेऊन मोकळी सुद्धां झाली !

**शशि**:—तिला तर मी पहिल्यापासूनच दुबळी समजत होतें. तिला आर्य-संस्कारांचं फार वेड होतं. असली भ्याड माणसंच खोटीं !

**विधु**:—( दांत चावून ) आर्यसंस्कार ! हं:—तो बायको विकणारा मोठा सत्यवादी हरिश्चंद्र—

**शिवगौरी**:—( तिरस्कारानें ) आणि तो बायकोला जंगलांत सोडून देणारा रामचंद्र—तो तर ईश्वराचा अवतार !—

**शशि**:—( हंसत ) आणि द्रौपदीचं वस्त्र फेडणारा मोठा वीर—

**विधु**:—( ओठ चावून )—नि स्त्रीला जुगारांत पणाला लावणारा धर्मराजा—

**शिवगौरी**:—( रागांत )–नि बिचाऱ्या झोपलेल्या स्त्रीला टाकून जाणारा गौतमबुद्ध—

**शशि**—( हंसत )–नि सोळा हजार एकशें आठ स्त्रियांचा जनाना बाळगणारा कृष्ण तर बाळब्रह्मचारी भगवान–[ बेल वाजते ]

**शिवगौरी**:—मिस् पिरोज आल्या वाटतं !

[ मिस् पिरोज आणि गं. भा. गंगाबेन प्रवेश करतात.

मिस् पिरोज वीस ते चाळीस वर्षे वयाची. तोंडावर पावडर आणि ओठावर रंग, केस बॉब केलेले; डाव्या हातांत असलेल्या कब्ज्यांत रुमाल खोंचलेला, ठुमकत चालणें. पारश्यांनीं दाखल केलेल्या संस्कृतीचें मूर्तीमंत चित्र. अविवाहीत, पण कलेची भक्त.

गंगाबेन पन्नास वर्षे वयाची स्त्री. डोळ्यांना चष्मा. वर्ण काळा. वेश साधा. पांढरें पातळ, पायांत चप्पल, गोड हंसून बोलण्याची पद्धत. एक उत्तम अध्यापिका म्हणून प्रसिद्धी. ]

**शिवगौरी**:—या–या–मिस पिरोज, कसं काय ? (शेक हँड करीत ) काय गंगाबेन ! बसा. (सर्व बसतात. ) चला. आल्या साऱ्याजणी. त्या लेडी कुंदाबेनना तुम्ही ओळखतांच ? त्यांचे यजमान पुण्याला गेले, कीं या चालल्याच त्यांच्या मागोमाग. ती एक पन्नास वर्षांची कळसुत्री बाहुली आहे बाहुली ! मिसेस दलाल आजारी आहेत. म्हणजे आतां राहतां राहिलों आपणच.

**पिरोज**:—( पंख्यानें वारा घेत ) उकडतं आहे अगदीं सगळीकडे. साहेब्जी All round ! आज मला रात्रीं कॉन्सर्टला गेलं पाहिजे.

**शिवगौरी**:—ओळखतां ना ? या मिस शशिकला–आपल्या नवीन सभासद, मिस पिरोज–आर्टीस्ट आहेत. आणि या गंगाबेन–अध्यापिका आहेत.

**शशि**:—[ पिरोजला] कसं काय ? [गंगाबेनला] गंगाबेनची ओळख पूर्वीच झाली आहे. कसं काय !

**गंगाः**—ठीक आहे. कसं काय विधुवेन, कुंदनलालनीं कायद्याचा खर्डा तयार केला का ? बराच अवधि लागला त्यांना !

**विधुः**—तें काम त्यांच्याकडून करून घ्यायची जबाबदारी शशिकलाबेननीं आपल्याकडे घेतली आहे–आतां सारं कांहीं होईलच.

**शशिः**—होय हो, कालच या बाबतींत माझं कुंदनलालशीं बोलणं झालं. जवळ जवळ तयारच आहे म्हणा ना खर्डा.

**पिरोजः**—कसला खर्डा ?

**विधुः**—स्त्री—

**शिवगौरीः**—स्त्रियांसाठीं एक कायदा आपल्या संघातर्फे तयार करवीत आहों. स्त्रीचं लग्न होतांच वराच्या मिळकतींतला भाग तिला मिळाला पाहिजे. पतीच्या पश्चात्ही मिळाला पाहिजे. तिला जरूर वाटल्यास कुटुंबापासून विभक्तही होतां यावं. पाहिजे तर घटस्फोटही करावा तिनं. या कायद्याचा खर्डा मिस्टर कुंदनलाल तयार करीत आहेत,

**पिरोजः**—पण कौन्सिलमधें कोण आणणार हा कायदा ? तुमचे वाणीया लोक नाहीं तयार झाले तर मग माझा जिमी आणील.

**शिवगौरीः**—हिंदू तर सगळेच विरोध करतील. ते स्त्रियांना हक्क द्यायला थोडेच तयार होतील ?

**गंगाः**—पण कौन्सिल स्वीकारील का ?

**शिवगौरीः**—( चिडून ) न स्वीकारून कुणाला सांगतात ? ताकद आहे ?

**विधुः**—ताकद कसली ? ( ओंठ चावते. )

**शशिः**—पुरुष स्वीकारतील किं नाहीं हा प्रश्न वेगळा आहे, पण आपल्याला मात्र आतां युद्धाला सज्ज झालं पाहिजे. ते दाद देतीलसं दिसत नाहीं. त्यांच्या हातीं घर आहे, समाज आहे, नीती आहे, कायदा आहे, तोपर्यंत थोडासुद्धां तुमचा शिरकाव होऊं देणार नाहींत.

**शिवगौरीः**—( हात आपटून ) खरं आहे–अगदीं खरं आहे.

**शशि:**—कायदा झाला तरीही निरुपयोगी ठरेल. लढायला आपल्याकडे पैसा नाहीं—

**विधु:**—( थोड्या कटाक्षानें ) आतां तुम्ही एकवीस वर्षांच्या झालांत म्हणजे व्हाल कीं श्रीमंत !

**शशि:**—असं होण्यांत काय फायदा ? आपल्यामध्यें स्वत: पैसा मिळवण्याची ताकद आली पाहिजे.

**पिरोज:**—यालाच Economic Independence म्हणतात.

**गंगा:**—खरं आहे म्हणणं तुमचं! आर्थिक स्वातंत्र्याशिवाय सर्व गोष्टी व्यर्थ आहेत.

**शिवगौरी:**—( जोरानें ) पण तें सर्वांना थोडंच मिळवतां येणं शक्य आहे ! त्यांच्या घरचं खाऊन त्यांनाच सीधा मार्ग दाखवावा ! पुरुष काय फुकटचं पोसतात वाटतं आम्हांला ? गाढवच जसा कांहीं ओझ्याचा, असं राब-वून घेतात !

**शशि:**—शिवगौरीबेन, जोंपर्यंत आर्थिक स्वातंत्र्य मिळालं नाहीं, तोपर्यंत हें लग्नाचं बंधन सुटणं कांहीं शक्य नाहीं. माझ्याजवळ पैसा नाहीं आणि कमाव-ण्याची ताकद नाहीं–मग मला काकांच्यावर–नाहींतर कुणा नवऱ्यावर अवलंबून राहणं भाग आहे !

**विधु:**—काय अन्याय आहे पहा ! माझे वडील वारल्यावर लगेच सर्व मिळकतीचा वारसा माझ्या भावांना मिळाला !

**शिवगौरी:**—( ओरडून ) हा अन्याय पुरुष करीत आहेत. जर बापाच्या मिळकतीवर मुलीला वारसा मिळेल, तर तिला लग्न करण्याची काय जरूर राहील ?

**गंगा:**—पण गोरगरिबांच्या मुलींचं काय ? त्यांना मिळवावंच लागतं ना ? आज पंचवीस वर्षें होऊन गेलीं, मी मिळवितेंच आहे कीं नाहीं ! मला कुणाची आडकाठी आहे ?

**शशि:**—हें सारं खरं. पण आपल्याला लग्नच करायचं आहे, मग कोण जातं आर्थिक स्वातंत्र्य मिळवायला ? हें लग्नच आपल्या दुःखाचं मूळ आहे.

**शिवगौरी**:--( उसासा टाकून ) खरं आहे !

**विधु**:—( ओंठ चावून ) अगदीं खरं आहे !

**पिरोज**:—I agree ! मलाही हें पटलं.

**गंगा**:—( हंसत ) पण पुरुषांशीं कांहींना कांहीं संबंध हा यावा लागतोच ना ?

**शिवगौरी**—( आवाज चढवून ) त्याला तोड आहे—पण आपल्याला सुचत नाहीं गंगाबेन. वासनारहित प्रेमापासून ज्यावेळीं विवाह होऊं लागतील त्याच वेळीं संसार सुखाचे होऊं लागतील. कविवर्य नानालाल यांच्या ' जया-जयंत ' मधें हेंच आहे. वासनारहित प्रेम ! लग्नरहित संबंध ! दोन्हीं बंधनरहित. कुणाही एकावरच जबाबदारी नाहीं. जबाबदारी सुटली कीं गुलामगिरी तुटली-मग पुरुष कसे अगदीं सुतासारखे सरळ !

**शशिकला**:—( हंसत ) स्फूर्तीपुरता पुरुषाशीं फार तर संबंध ठेवावा ! स्त्री देवता आहे–पुरुष असुर आहे. म्हणूनच स्त्री पुरुषाला स्फूर्ति देते. स्त्रीमधें खरं स्त्रीत्व असेल तर कोणत्याही प्रसंगी-काय वाटेल तें झालं तरी–त्या स्त्रीपुढं पुरुष नम्र भावानंच वागतील नि तीच त्यांची भाग्यविधात्री होईल—त्यांना अंतःस्फूर्ति देईल–त्यांची जीवनज्योत अखंड तेवत ठेवील. जोन ऑफ आर्कनं पुरुषांच्या स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं कौमार्य पत्करलं मग स्त्रियांच्या स्वातंत्र्य-प्राप्तीसाठीं स्त्रीनं कौमार्य पत्करायला नको का ?

**पिरोजा**:—( पर्समधून लहानसा आरसा काढून त्यांत ओंठ तपाशित असतां ) हें मला बिलकूल पसंत नाहीं. मला फक्त नवरा पाहिजे–प्रेम करायला-डान्सला जायला--डिनरला घेऊन जायला ! Your Joan of Arc is a prehistoric ideal.

**शिवगौरी**:– ( आर्द्रतेनें ) तुमचे काका काय म्हणतात ?

**शशिकला**:--स्त्रीस्वातंत्र्य हा शब्द सुद्धां उच्चारलेला काकांना खपत नाहीं. पण करणार काय?–चालू महिन्यांत मला एकवीस वर्षें पुरीं झालीं म्हणजे मी वेगळी होणार आहें. मग त्यांचा मार्ग वेगळा नि माझा वेगळा.

**पिरोज**:—तुमचे काका अगदींच कर्मठ सनातनी आहेत तर !

**शशिः**—बाकी सगळ्या गोष्टींत ते फार पुढारलेले आहेत. मात्र आपल्या जातीच्या बाबतींत ते आपले कट्टे वैरी आहेत.

**पिरोजः**—त्यांच्या पत्नीमार्फत—

**शिवगौरीः**—( उसासा टाकून ) बिचाऱ्यांचं लग्नच झालं नाहीं हो !

**शशिः**—ते स्त्रीशत्रू आहेतना !

**विधुः**—( खिन्नतेनें ) पण आम्हां विवाहितांचं काय ? आम्ही असं कचऱ्यागतच मरायचं का ? मुख्य अडचण आहे ती विवाहितांची आहे.

**शशिः**—हा प्रश्न तुमच्या स्वतःच्या हातीं आहे. मनांत आणाल तर प्रत्येक बाबींत तुम्हीं पुरुषांना सीध्या रस्त्याला आणाल !

**विधुः**—( खंवचटपणानें ) जगांत कसा अन्याय चाललाय पहा ! पुरुष वाटेल तसे-वाटेल त्या स्त्रीबरोबर-वाटेल त्या ठिकाणीं जाऊन मजा करूं शकतात-त्यांना कुणीच नांवं ठेवीत नाहीं-पण तेंच एकाद्या स्त्रीनं एकाद्या शेजारच्या मित्राशेजारीं बसून नुसता चहा घेतला, तर जग तिच्यावर आग पाखडतं!-घरांत राहणंसुद्धां तिला मुष्कील होतं !

**शिवगौरीः**—कां म्हणून आपण हें सहन करायचं ? पुरुषांच्या जुलमामुळंच आमच्या संसारांत बिघाड आला-पण काय होईल तें होवो या निश्चयानंच मी नकार दिला. असल्या जिण्यापेक्षां मेलेलं काय वाईट ?

**विधुः**—सर्वांची हीच स्थिती आहे. पण करणार काय ? पुरुषांनीं लग्न-बंधन झुगारून दिलं तर त्यांना कुणीच आडकाठी करीत नाहीं, पण तीच एकादी स्त्री—

**शिवगौरीः**—( मिजाशींत ) कां म्हणून स्त्रियांनीं अशा कोंडमाऱ्यांत राहावं ? पुरुषांनीं लग्नबंधन झुगारलं म्हणजे स्त्रीनंही तसंच करावं ! ठोशास ठोसा, असंच वागलं पाहिजे आतां !

**गंगाः**—नडतं आहे तें इथंच !

**पिरोजः**—( ओठाला रंग लावीत ) तुमचे वाणीया लोक अगदींच जंगली आहेत.

**शशिः**—( हंसत ) माझे काका तर हा पुरुषांचा जन्मसिद्ध हक्क आहे असं मानतात.

**पिरोजा**:—शेम ! ( सर्वच वातावरण गरम होतें )

**शशि**:—( तिरस्कारानें ) ते म्हणतात, प्रत्येक पुरुषानं आपल्या स्त्रीला हवी तशी घडवून घ्यावी—तो अधिकार आहे पुरुषाचा ! शहाण्याला शब्दाचा मार !

**पिरोजा**:—असल्या माणसाच्या सहवासांत तुम्ही कशा राहूं शकतां याचं मला खरोखर आश्चर्य वाटतं !

**शशि**:—( हंसत ) ही त्यांची मतं फक्त बोलण्यापुरतींच—आचरण तसं नाहीं त्याचं.

**विधु**:—( म्लान होऊन ) मग काय शिवगौरीबेन, पुरुष जशी चैन करतात तशी स्त्रियांनीही करावी म्हणतां ? ( शिवगौरी गंभीरपणें होकार देते. )

**पिरोजा**:—Why not ?

**गंगा**:—यावरून आपण कसं वागावं याबद्दल कुणाचंच एकमत दिसत नाहीं.

**शिवगौरी**:—शशिबेन, तुमचं काय म्हणणं आहे ?

**शशि**:—यापेक्षां आपला संघ अधिक काय करूं शकणार ? पण यापुढं आपण प्रत्येकीनं स्त्रीस्वातंत्र्यासाठीं अखेर पर्यंत लढलं पाहिजे, एवढं खरं.

**शिवगौरी**:—खरं पाहिलं असतां श्वासोश्वासांत सुद्धां स्त्रीस्वातंत्र्याची भावना उमटली पाहिजे.

**शशि**:—स्त्रीस्वातंत्र्याच्या प्रेरणेनंच आपला रोजचा दिनक्रम चालवला पाहिजे.

**शिवगौरी**:—( हातावर हात मारून ) आपल्या हातांत समानतेचं बळ आलं पाहिजे.

**शशि**:—या जीवनमंत्र्याला चिकटून राहाण्याची आपण शिकस्त केली पाहिजे.

**शिवगौरी**:—( उत्साहानें ) शिर कापलं तरी निर्धार सोडतां नये आपण !

**शशि**:—धार्मिक आचारविचारांना धरून आपण लढलों तरच या धर्मयुद्धांत आपण जयं मिळवूं—

**शिवगौरी**:—( आर्द्रतेनें ) आणि यशाचा डंका जगभर पसरवूं—

**पिरोजः**—That's right.

**शशिः**—प्रत्येकीला आपापल्या शक्तीप्रमाणें मार्ग सुचेल. शिवगौरीबेनच्या मतें, वासनारहित प्रेम म्हणजे Platonic love चे विवाह झाले पाहिजेत! विधुबेनना, शठं प्रति शाठ्यम् हें धोरण पसंत आहे—

**विधुः**—[ कुत्सितपणें ] आणि तुम्हाला लग्नबंधनच मुळीं मान्य नाहीं.

**शशिः**—नाहींच मुळीं.

**शिवगौरीः**—आणि मिस पिरोजना पुरुषांची हृदयं फोडायला इर्वीत!

**विधुः**—नि गंगाबेन आर्थिक स्वातंत्र्यालाच जास्त मान देतात.

**शशिः**—प्रत्येकीनं आपापल्या मताप्रमाणें ध्येय आंखून तें पूर्णत्वाला नेण्यासाठीं आटोकाट प्रयत्न केले पाहिजेत. एक भावनामय जीवन हजार सभेंतील चर्चोपेक्षां जास्त कार्य करील!

**शिवगौरीः**—शाबास शशिबेन! आमच्या संघाचं तुम्ही भूषण आहांत. पण खरंच तुम्ही एवढं सर्व शिकलात तरी कुठं!

**शशिः**–( हंसत ) एक तर माझ्या काकांच्या बरोबर झालेल्या चर्चेवरून! स्त्रीसंबंधींच्या चर्चेत ते जी बाजू घेतात त्याची उलट बाजू नक्की खरी आहे असं समजावंच. आणि दुसरं–माझ्या कॉलेजमधल्या मित्रांच्या अनुभवावरून. मी जेव्हां कॉलेजमधें होतें तेव्हां हे सर्व स्नेही सदोदीत माझ्याभोंवतीं कोंडाळं करून असायचे. माझ्या शब्दाच्या तालावर नाचायला हे तयार असायचे. त्या वेळींच मला वरंचसं कळून आलं.

**विधुः**—पण शशीबेन–समजा–पती आडमार्गानं जाऊं लागला–तर स्त्रीनंही तसंच वागायचं का?

**शिवगौरीः**—कां वागूं नये? त्यांचा हक्क आणि तुमचा नव्हे? [ सर्वांना चहा देते. ]

**शशिः**—थँक्यू. असं झालं तर त्यांना कळेल तरी, कीं पत्नी बिथरली तर किती दिवस चालतं तें!

**पिरोजः**—खरं आहे. Practice before preaching. माझा मित्र माझा त्याग करणार आहे असं आढळून आलं, तर त्यापूर्वीं मीच त्याचा त्याग करीन. [ चहा पिऊं लागतात. ]

विधुः—[ म्लानपणें ] पण किती झालं तरी तो पती आहे.

शिवगौरीः—आमचं चुकतं तें इथंच ! पती म्हणजे काय ? एक माणूसच ना ? जशा आपण तसाच ना !—दोघंही सारखींच असं समजाल, त्यादिवशींच आपलं बंड—

गंगाः—( हंसत ) सत्याग्रह !—

शिवगौरीः—( अधीर पणें) हो सत्याग्रहच—आलेल्या परिस्थितीला टक्कर द्यायला तयार राहिलं पाहिजे.

शशीः—हेंच खरं धर्मयुद्ध.

शिवगौरीः—आपण आजपासूनच सुरवात करूं !

पिरोजाः—उद्यांपासून मी केलीच सुरवात.

गंगाः—मला सुरवात करण्याचा प्रश्नच संभवत नाहीं.

( घंटा वाजते )

शिवगौरीः—रामा, कोण झालं पहा बरं !

( शशिकलेचा शोफर बूट, पाटलोण, सोन्याची बटणें लावलेला कोट, अशा थाटांत प्रवेश करतो.)

शोफरः—बाईसाहेब, शेट आले आहेत.

शिवगौरीः—( हंसत, ) कोण ?—तुमचे काका वाटतं !

शशीः—हं—सांग त्यांना मी आलेंच !

शिवगौरीः—वर बोलवा ना त्यांना !

शशीः—नको. ते मला क्लबवर न्यायला आले आहेत.

शिवगौरीः—इथं आले आहेत ते काय चहा घ्यायल्याशिवाय जाणार ?

पिरोजः—I should like to see the old ogre.

शिवगौरीः—शेटसाहेबांना सांग—बाई वर बोलावताहेत. ( शोफर जातो )

शशीः—असे नाहीं यायचे ते. ( खिडकींतून खालीं पाहून, येण्यासाठीं टाळी वाजवून खुणा करते. शिवगौरी कपडे ठाकठीक करते. पिरोजा पर्स मधून आरसा-पफ-लीपस्टीक काढून टॉयलेट करते. गंगा चष्मा काढून पुसते. विधुमुखी केसावरून हात फिरवते. )

**पिरोजाः**—हे तुमच्या father चे धाकटे कीं मोठे बंधु ?

**शशिः**—ते माझ्या वडिलांचे भागीदार. माझे वडील लहानपणींच वारल्या-मुळं त्यानींच मला लहानाची मोठी केली.

**पिरोजाः**—( उसांसा टाकून ) I wish I had a shamefully rich uncle like yours !

[दार आणि सोफा यामधें शशिकला जाऊन उभी राहाते. एकंदर वातावरणांत उत्सुकता दिसते. कुणीच चहा पीत नाहीं. थोड्याच वेळात मनहरलाल दरवाजांत उभे राहतात. सर्व उठून उभ्या राहातात. सुरती पगडी, बंद कॉलरचा काळ्या रंगाचा कोट, पांढरी पाटलोण आणि काळे बूट असा पोषाख केलेले मनहरलाल. ]

**शशिः**—( पुढें येऊन ) या काका ! या साऱ्याच आतुर झाल्या आहेत तुम्हाला भेटायला !

**मनहरलालः**—( मजेंत येऊन ) पण मला तीन दादर चढावे लागले त्याचं काय ? नमस्कार.

**शशिः**—मिस् पिरोजा–आर्टीस्ट आहेत.

**पिरोजाः**—( हात पुढें करून ) How do you do ?

**मनहरः**—( हात जोडून हंसत ) योगमायेला माझा दुरूनच नमस्कार.

**पिरोजाः**—( स्वागत ) Idiot ! I will break his heart !

**शशिः**—या शिवगौरीबेन–मोतीराम डेप्युटी सुपरिंटेंडेंटच्या भागिनी–आमच्या संघाच्या सेक्रेटरी.

**मनहरः**—( हात जोडून ) तुझ्या संघाच्या ? ( हंसत ) बायकांना मिशा आणायचा संघ ना ? ( सगळ्या कचरतात. पण मोठ्या माणसाचे बोल वरवर हंसून साजरे करतात. )—कसं काय ? मोतारामला मी चांगलाच ओळखतों.

**शिवगौरीः**—( मिठ्ठास हंसून ) मीही आपल्या घरीं दोनतीन वेळां आलें होतें. इंथ आल्यावर थोडा चहा घेतल्याशिवाय जाणार ?

**शशीः**—या विधुबेन—

**मनहरः**—कुंदनच्या बायकोची का ओळख करून देतेस ? काय ? ( विधुमुखी नुसती हंसते )

**शशीः**—या गंगाबेन–वाणीआ हितवर्धक सभेच्या शाळेंतील मुख्य अध्यापिका.

**गंगाः**—जय श्रीकृष्ण.

**मनहरः**—जय जय बेन. कसं काय ? ( बसतो )

**शिवगौरी**—( हंसत चहा देते ) मनहरलालशेट, तुम्ही वाळकेश्वरला राहतां नाहीं ! एक दिवस मला शशीबेनला भेटायला यायचं आहे.

**मनहरः**—माझ्या घरीं भेटायला यायचं असलं तर याच महिन्यांत या. पुढल्या महिन्यांत ती वेगळी होणार आहे.

**शिवगौरीः**—कां ?

**मनहरः**—तिला आतां एकवीस वर्षे पुरीं होतील. मग तिच्या घरीं ती नि मी माझ्या. ( हंसत ) असली बंडखोर मुलगी मला कशी पुरी पडेल ?

**पिरोजः**—शेट, मी असं ऐकलं आहे–कीं तुम्हीं म्हणे स्त्रियांचे कट्टे शत्रू आहांत ? असं काय तुमचं त्यांनीं घोडं मारलं आहे !

**मनहरः**—( विनोदानें ) घोडं मारलं खरं ! माझी आई मला जन्म देऊन मरून गेली मला विचारल्याशिवाय ! मला एक बहीण होती; तीही लग्न करून गेली–मला विचारल्याशिवाय ! नि शशीही सफ्रेजेट बनली–मला विचारल्याशिवाय ! ( सर्व हंसतात ) इतर कुणा स्त्रीचा सहवास लाभलाच नाहीं मला !

**शिवगौरीः**—( लाडिकपणें ) शेट, तुम्ही लग्न कां नाहीं केलं ?

**मनहरः**—एक तर मला लग्न करायला सवडच नाहीं–नि शशी म्हणते तसा मी स्त्रीशत्रू आहें. मला हवी आहे तशी बायकोच मुळीं मिळत नाहीं.

**शिवगौरीः**—( हंसत ) काय बोलतां आहांत ?

**मनहर**—(गंभीरपणें) खरं आहे हें. मला हवी आहे तसली स्त्री देवानं मुळीं जन्मालाच घातलेली दिसत नाहीं

**विधुः**—( हंसत ) असंच म्हणाना, किं तुम्हाला लग्नच करायच नाहीं ! मनांत आणाल तर तुम्हांला पसंत पडेल अशी पत्नी मिळणं फारस कठीण नाहीं.

**मनहर**:--तुमच्या या जातचिी बायको मला काय कामाची ? ( सर्व हंसतात. )

**शिवगौरी**:—काय कामाची म्हणजे ? आमच्या खेरीज दुसऱ्या अशा काय असतात ?

**मनहर**:—देव जाणे ! पण असल्या पोरीशीं लग्न करून मी काय करूं तेंच मला समजत नाहीं. बिचारीला रंगरोगण करतांना माझी विचारपूस करायला, नि स्वतःचे कपडे सांभाळतांना माझी उठाबस करायला, कुठून फुरसत मिळणार ? स्वतःच्या बुद्धीचा बडेजाव परपुरुषाला दाखवायचा प्रयत्न करीत असतांना माझं मनरंजन करयाला एक क्षण तरी कसा मिळणार तिला ? स्वतःच्या हक्कासाठीं झगडत असतांना कर्तव्य काय याचा विचार तिला कसा सुचणार ?

**पिरोज**:--You are a savage !

**मनहर**:—( गंभीरपणें ) जंगलीच का ? उरांग उटांग म्हटलंत तरीही चालेल—पण मला एका मानवीबरोबर लग्न करायचं आहे ना !

**शिवगौरी**:—पण शेट—पूर्वींच्या स्त्रिया दागदागिने, कपडेलत्ते वापरीत नव्हत्या का ?

**मनहर**:—त्या वापरीत होत्या केवळ एका नवऱ्यासाठीं; नवऱ्याच्या समाधानासाठीं.

**पिरोजा**:—शेम !

**मनहर**:—आजकाल स्त्रिया साजशृंगार करतात जगाला प्रदर्शन करून दाखवण्यासाठीं. मला बायको पाहिजे, ती माझ्यासाठीं साजशृंगार करणारी—माझ्यासाठीं सुंदर दिसणारी !

**शिवगौरी**:—( हंसत ) तुमची हद्द झाली ! तुम्ही एकाद्या मोंगल बादशाहाच आव आणतां आहां. ( स्वगत ) बोलतात जें तोंडाला येईल तें. पण एकंदरींत माणूस दिसतो फक्कड !

**विधु**:—मग स्त्रियांच्या हक्काची चर्चा तरी कशाला करतां ?

**मनहर**:—शशीकडून या हक्कासंबंधी मी इतक्या वेळां नि इतकं ऐकलं आहे, कीं त्यामुळं माझे कान अगदीं किटून गेले आहेत. समानहक्कावर तुमचा

अधिकार आहे खरा–पण तसलं अनुकरण करायची ताकद मला नाहीं. आजकाल समानहक्क म्हणजे, पुरुषाशीं लग्न करायचं–पण मुलाबाळांची जबाबदारी नको, त्याचा पैसा हवा चैन करायला–पण तो त्याच्या मर्जी-प्रमाणें नव्हे—

**पिरोजा**:—Oh dear !

**मनहर**:—मुलांची निगा स्वतः न करतां नोकराकडून करवायची ! पतीचं सुख तें आपलं सुख नव्हे–तर स्वतः दुःखी आहें अशी ओरड करून दुस-ऱ्याला दुःख द्यायचं! ( हंसत ) तुमच्या अलिकडच्या स्त्रिया नुसत्या जळत्या निखाऱ्यासारख्या झळकत असतात नि स्वतःची नि दुसऱ्याची झळींनंच जाळून राख करतात, अशा बायकांना पाहूनच मला हुडहुडी भरते. ( हंसत ) उद्यां मला तीन डोळेच कां नाहींत नि दोन नाकंच को नाहींत अशी जर शशी तक्रार करूं लागली तर त्याचं मला यत्किंचितही आश्चर्य वाटणार नाहीं.

**विधु**:—मग एकादी जुन्या जमान्यातली स्त्री काढाना शोधून! ती तुम्हाला पसंत पडेल.

**मनहर**:—जुन्या काळची स्त्री पाहूनही मला अशीच हुडहुडी भरून येते. ती असणार एकाद्या चिमुकल्या बाहुली एवढी आणि तिला सांभाळावी लागणारही बाहुलीसारखी. ती बोलली तर ऐकणं कठीण जाईल अन् चालली तर धरणी कापूं लागेल. जवळ बसून बोलूं लागलं तर ऐकून घेईल कीं काय याचीसुद्धां शंका! कुत्र्याच्या शेपटीला विटकरी बांधल्यासारखी ती बायको घेऊन मी काय करूं ?

**शशि**:—( खुप हंसून ) काका—तुमच्या जोगती बायकोच मुळीं घडवली नाहीं परमेश्वरानं.

**मनहर**:—( मिठ्ठासपणें हंसून ) म्हणूनच पोरी असा स्वस्थ राहिलों आहे ना ?–

**गंगा**:—मग एकाद्या वयस्क अशा चांगल्या प्रातिष्ठित विधवेशीं कां नाहीं लग्न करीत ?

**मनहर:**—म्हणजे पाहिल्याच दिवशीं तिच्या आधींच्या अनुभवाचा लाभ मिळायचा ! 'हें तुम्ही योग्य नाहीं करीत-माझा यापूर्वींचा असा अनुभव आहे' असं ऐकायची ! नव्हे-बायांनो-नव्हेच तें !

**शिवगौरी:**—( हंसत ) तुमच्या सारख्यांना काय पाहिजे आहे हें मला चांगलं कळतं आहे.

**मनहर:**—तें मलाही कळतं आहे पण वळत नाहीं ना !

**शिवगौरी:**—( मिठ्ठास नजरेनें) तुमच्यासारख्यांना अफलातुनी प्रेम पाहिजे आहे. Platonic love वासनारहित प्रेम-देहलग्नाविना प्रेमलग्न ! काय ? खरं ना ?

**मनहर:**—शशी लहान असतांना एकदां मी एक साखरेचा हत्ती आणून कांचेच्या कपाटांत ठेवून दिला होता. ही रोज त्या कपाटाजवळ जाऊन-तो हत्ती आपल्याला चाखायला मिळेल या समजुतीनं त्या कांचेच्या दाराला जीभ लावून चाटीत असे. असली अधिरी-वळवळी बायको मला नको आहे. मला पाहिजे आहे नुसती तळपती जागती ज्योत !

**पिरोजा:**—You are hard to please. Try a statue.

**विधु:**—मग तुम्ही तुमच्या इस्टेटीचं काय करणार आहांत ?

**मनहर:**—मी वुइल करून ठेवणार आहे. माझ्या पश्चात्, माझ्यासारख्या ब्रह्मचाऱ्यांसाठीं एकादं हॉटेल काढावं-ज्याला मनासारखी बायको मिळत नसेल त्यानं खुशाल येऊन तिथं मोफत मौज करावी.

**गंगा:**—पण अशानं जग कसं चालेल ?

**मनहर:**—( उभा राहून ) तुम्ही मागतां आहांत ते हक्क मिळाल्या-नंतर जसं जग चालेल, त्यापेक्षां फार उत्तम चालेल ! बरं ! मी जातों आतां. फार वेळ झाला-शशी, येतेस ना ?

**शशि:**—आज तुम्ही इतक्या शिव्या दिल्या आहेत आम्हाला, कीं आतां तुमच्याबरोबर मी जावं कीं न जावं याचाच विचार पडला आहे मला.

**मनहर:**—मी जितक्या शिव्या दिल्या आहेत तितक्या शिव्या दे मला मोटारींत नि घे भरपाई करून ! मग तर झालं !

शिवगौरीः—( मनहरलालकडे पहात ) अडचण होत नसेल तर मीही येतें म्हणतें ! ( उभी रहाते )

मनहरः—( हंसत ) मिस पिरोजांना आणि गंगाबेननांही घेऊन जा बरोबर सखी.

शिवगौरीः—कां ? तुम्ही नाहीं येत ?

मनहरः—अंहं. मी चालत जाणार आहें.

शशिः—( हंसत-हंसत ) चला, नक्की करा-कोण येणार नि कोण येणार नाहीं ?

मनहरः—( विनोदानें ) स्त्रीला पुरूष बनवूं पाहाणाऱ्या या अल्का सभेला घेऊन मी कुठं जाऊं बायांनो ? तुला जायचं असलं तर तूं जा सखि.

पिरोजः—चला माझ्याबरोबर-माझी टू सीटर आहे.

मनहरः—अंहं-Thank you !

शशिः—( हंसत ) मी, काका नि विधुबेन जावों-तुम्ही बसा इथं. चला.

मनहरः—माफ करा हं-वाईट वाटून घेऊं नका. शशी म्हणते तसा खरो खरच मी तुमचा वैरी आहें—मला कुणी बोलावूंच नये घरीं.

शिवगौरीः—तुम्हांला आमच्या पक्षांत सामील करून घेऊं तरच आम्हीं नावाच्या ! घाबरूं नका !

मनहरः—ईश्वर माझं रक्षण करो ! चला-जय जय-साहेबजी-( जातो.)

शिवगौरीः—उद्यां घरीं आहांत का शशिबेन ? येणार म्हणतें मी !

शशिः—जरूर या. [ जाते ]

विधुः—साहेबजी ! [ जाते ]

पिरोजाः—What an idiot !

शिवगौरीः—ईडियट नाहीं कांहीं-त्यांची बोलण्याची पद्धतच ती. स्त्रियांचा वैरी आहे खरा-पण किती आनंदी प्राणी आहे !

गंगाः—पैसेवाला आहे म्हणून ऐकून घेतलं. नाहीतर—

शिवगौरीः—अर तीही ऐकायलाच लायकी असली.

पिरोजाः—चला गंगाबेन. Thank you—साहेबजी-शिवगौरीबेन, गुड आफ्टरनून-[ जाते ]

**गंगाः**—चला. मी जातें हं–[ जाते ]

**शिवगौरी**—Wonderful man ! किती सरळ ! ( वर दृष्टि लावून ) अशा कुणाबरोबर जर मला प्लॅटॉनिक लव्ह करतां येईल तर किती आनंदी होईल हा संसार !–जन्माचा प्रश्न मिटेल. प्लेटॉनिक लव्ह–अफलातुनी प्रेम—केवढा भव्य आदर्श ! आत्म्याचं ऐक्य पण देह सदा निराळा–आत्म्यांत आत्मा मिळून गेलेला [ मनाशीं हंसत ] तुझं तें माझं नव्हे नि एकमेकांवर जबाबदारी नाहीं–लग्नाचा आनंद–पण जबाबदारी नाहीं कसलीच ! [ उठून आरशांत पहात पाहाते ] एक दुसऱ्याच्या करपाशांत–अर्थात आध्यात्मिक रूपांत ! जीवनांत विहार करणारी जयाजयंतची शुद्ध नि सात्विक प्रेमाची जोडी !—( बेल वाजते ) हें मेलं कोण आलं ? जरा स्वस्थ बसूं देतील ! रामा, कोण आलं पहा ! [ चिडून पहात असते ]

[ काठी उडवीत दुर्लभराम प्रवेश करतो. उंच–किडकिडीत नि बटबटीत डोळे, भल्यामोठ्या मिशा, बोलतांना शेवटचे शब्द चावूनचावून बोलण्याची खोड. ]

**दुर्लभरामः**—पोरी, कसं काय ? ( काठी ठेवून बसतो )

**शिवगौरीः**—( दचकून ) कोण ? काका ?

**दुर्लभः**—[ रागानें ] हें सगळं लष्कर तुझ्याकडेच आलं होतं वाटतं ? हं ! या बायका कशाला जमल्या होत्या इथं ?

**शिवगौरीः**—[ मिजाशींत ] त्यांत तुमचं काय गेलं ?

**दुर्लभः**—(हातांत काठी धरून शब्द चावीत ) माझं-माझं-माझं काय गेलं? माझं नाहीं गेलं तर कुणाचं गेलं ? तुझ्या बापाची अब्रू गेली तर ती माझ्या भावाची कीं कुणा दुसऱ्याची ? पोरी, हें रंगढंग कधीं टाकणार आहेस–बोल ? ( डोळे वटारून ) सासरीं कधीं जाणार आहेस ? बोल ना–अशी मुळावर ये.

**शिवगौरीः**—( त्याच्या समोर बसून जोरानें हात उडवीत ) काका हात जोडतें तुमच्यापुढं ! मेलेल्याला मारण्यांत काय पराक्रम !

**दुर्लभः**—ओहोहो! मेलेली म्हणे ! चार वाघ पळवून लावशील एवढी माजली आहेस ! बस्स बकबक!–पांच वर्षे झालीं–मी रंगूनला होतों म्हणून फावलं तुझं ! आधीं सासरी कधीं जातेस सांग? —मागाहून पाहूं बाकी.

**शिवगौरी:**—( डोळे वटारून ) येईल माझ्या मर्जीला तेव्हां जाईन ! तुमचं काय गेलं ? मी कांहीं कुणाची गुलाम—

**दुर्लभ:**—( काठी आपटून ) गुलाम—गुलाम–गुलाम नव्हेस तूं ? ( ओरडून ) काय बायको आहेस कीं बंदूक आहेस ? गुलाम ! तुझी आई सासरीं गेली होती कीं नव्हती ? नि तुझी आजी कुमारीच मेली असेल नाहीं ? नव्हे बरं—मुंबईला आलों आहे मी आतां. निमूटपणें चल, नाहीं तर कान पकडून खेंचून नेईन. तो इंद्रजीतही मेला बायल्याच ! तुझ्या सारखीला मोकाट सोडली आहे ! हातांत छडी धरायची ताकदच नाहीं ! तुझे नाककानच छाटून टाकायला हवे होते त्यानं !

**शिवगौरी:**—( रुमालानें डोळे पुशीत ) हं—कापतील–कापतील–रस्त्या-वरच पडलें आहे किं नाहीं ! ( बेल वाजते ) काका–कुणी आलं वाटतं!

**दुर्लभ:**—मग ?–मला काय त्याचं. कुणाची भीति आहे का मला ?

( मोतीराम प्रवेश करतो )

**मोतीराम:**—कोण ? काका ?

**दुर्लभ:**—( तिरस्कारानें ) तूं आलास–ठीक झालं. बस मोती इथं. काय आरंभलं आहेस हें ? या पोरीला सासरीं कां नाहीं पाठवून देत तूं ?

**मोतीराम**—( पट्टा सांवरीत ) तुम्हांला काय माहीत काका ! त्या कुत्र्याचं नांवच सोडून द्या. माझी बहीण विधवा झाली आहे असंच मी समजतों. त्या कुत्र्याकडे नाहीं जाणार, नि नाहींच जाणार.

**दुर्लभ:**—( डोळे वटारून ) विधवा–विधवा–विधवा झाली ? मग हा मळवट कशाला कपाळावर ? बोलाव ना हजामाला ! विधवा झाली म्हणे ! नवरा आहे ना अजून जिवंत–कांहीं शरम वाटते आहे का शरम ? तुम्ही तर अगदीं ढुंगणाचं सोडून डोक्याला गुंडाळूं लागलां आहांत ! कांहीं वाड-वडीलांच्या अब्रूची चाड आहे का ? आतां मी आलों आहें इथं–कांहीं चालायचं नाहीं तुमचं.

**मोतीराम:**—पण काका–तो गद्धा अगदीं नादान आहे.

**दुर्लभ:**—नादान ! नादान ! मर्दासारखा मर्द नि तुला नादान वाटला ?

**मोतीराम**:—तिचा बिचारीचा छळून छळून जीव घेतला त्यानं.

**दुर्लभ**:—छळून ! कां नाहीं छळणार ? तुला राग येत नाहीं ? राग मला येत नाहीं !–राग आला कीं छळणारच !

**मोतीराम**:—( समजूतीनें ) सकाळीं उठली—

**दुर्लभ**:—मीही उठतों सकाळीं !

**मोतीराम**:—कीं पाणी भरीत—

**दुर्लभ**:—नवऱ्याच्या घरचं पाणी भरते हे उपकार का कुणावर ?

**मोतीराम**:—( कळवळून ) पण किती करायचं तिनं ? पाणी भरायचं. जेवण करायचं.–हा जसा कांहीं मोठा बादशहाच. तिनं पाणी दिलं कीं स्नान करायचं–नि जेवण वाढलं कीं पाटावर बसून जेवायचं.

**दुर्लभ**:—हो–हो–हो–हो–तुझी बहीण मोठी राणीसाहेबच नाहीं ? नवऱ्याचं पाटपाणी सुद्धां करायचं नाहीं तिनं ? अरे वारे वा !

**शिवगौरी**:—नि मारमारून माझा जीव काढला !

**दुर्लभ**:—साफ खोटं. एकाद्या मरत असलेल्याला मरतो आहे असे शब्द उच्चारायला कचरणारा इंद्रजीत, तुझा जीव काढतो ? जीव काढला म्हणे ! निघून गेला नाहीं ना जीव ? रेड्यासारखी माजली आहेस ! आणि समजा, नवऱ्यानं मारलं–तर त्यांत काय बिघडलं ? अरे तो इंद्रजीत कायस्थ आहे म्हणून तुझं फावलं आहे. मी असतों तर तुझं नाक कापून—

**मोतीराम**:—( चिडून ) काका, त्या नीचाच्या घरीं माझी बहीण जाणार नाहीं–नाहीं–नाहीं–नाहीं.

**दुर्लभ**:—कशी जात नाहीं तें पाहातों ? जीवानिशीं मारीन ! ( काठी घेऊन उठतो. बेल वाजते. कुंदनलाल प्रवेश करतो. ) हे पहा वकीलसाहेब आले ! अहो मुरब्बी, तुम्ही तर एक नांव घेण्याजोगेच प्राणी दिसतां ! वकील होऊनसुद्धां योग्य सल्ला देत नाहीं !

[ कुंदनलाल पस्तीस एक वर्षांचा अपटुडेट असा वकील. वड्याळाच्या छेड्यावर हात ठेऊन बोलण्याची ढब. ]

**कुंदनलाल**:—काय आहे दुर्लभराम ?

**दुर्लभः**—अरे बावा—लग्न होऊन इतके दिवस झाले तरी ही मुलगी सासरीं जायला तयार नाहीं ? ही काय रीत झाली माणसाची ?

**कुंदनः**—अहो काका ! आजकाल दुनिया बदलली आहे ! मर्जीला येईल तसं प्रत्येकानं वागायचं ठरवलं आहे, मग तिथं तुम्हीआम्ही काय करणार त्याला ?

**दुर्लभः**—( डोळे वटारून ) मी काय करणार ?—काय करणार ! सगळे नादान आहांत तुम्ही ! बांगड्या भरा !—तुम्हांला नाहीं सुचायचं. मी असतों तुमच्या जागीं तर या कारटीच्या झिंज्या पकडल्या असत्या नि सासरीं घेऊन गेलों असतों.—मरायचं असलं तर मर कुठे तुझ्या घरीं म्हणून सांगून निघून आलों असतों. ( दांत चावून बोलतो ) काय करणार ? काय करणार, तें मी दाखवतों चला तुम्हांला !

**कुंदनः**—( हंसत ) ते दिवस गेले बरं दुर्लभराम !

**दुर्लभः**—( डोकें हालवून ) पाहातों—पाहातों ! ( खिडकीकडे जातो. )

**कुंदनः**—विधु इथं नाहीं ? मला वाटतं इथं असेल ती.

**शिवगौरीः**—शशीबेनबरोबर ती केव्हांच गेली.

**कुंदनः**—असं ? मग ती क्लबांतच गेली असेल.

**दुर्लभः**—( परतून खदखदां हंसत ) जा--भाईसाहेब--दिवा घेऊन धुंडाळा लोकांचीं घरं. मी काय करणार ?—चला माझ्याबरोबर वकीलसाहेब !

**कुंदनः**—मोतीराम—साहेबजी. जयजय—शिवगौरी !

**दुर्लभः**—( कुंदनलालला खेंचून ) अहो, चला वकीलसाहेब चला.

( दोघे जातात )

**शिवगौरीः**—परमेश्वरा—या त्रासांतून केव्हां सोडवणार मला ?

**मोतीरामः**—( वर पाहात ) नि केव्हां सोडवशील मला ?

**शिवगौरीः**—( फणकाऱ्यानें ) थोडा झाला छळ, म्हणून का भाई तूं त्यांत अशी त्यांत भर घालतोस ?—

[ पडदा पडतो ]

## प्रवेश दुसरा

[ **वेळः**—दुसऱ्या दिवशीं सकाळीं, शांकरभाष्य पुस्तक वाचीत इंद्रजीत बसला आहे. ]

**गंगाबेनः**—( हातांत गीता घेऊन प्रवेश करते ) काय मास्तर, काय करतां आहांत ?

**इंद्रजीतः**—( पुस्तक बंद करून धीमेपणानें ) कोण गंगाबेन ! या !

**गंगाः**—बसा ना ! आचारी आला आहे का आज ? ( खुर्चीवर बसते. )

**इंद्रजीतः**—हं ( बसून पुस्तक वाचीत असतांच वर पाहून उत्तर देतो. )

**गंगाः**—( गीता उघडून वाचूं लागते ) मी कुणाला भेटले होतें—ओळखाल का ?

**इंद्रजीतः**—समजलों. ( सुस्कारा सोडतो. पुस्तक वाचीत असतो )

**गंगाः**—( थोडं वाचून ) फार वाईट आहांत तुम्हीं.

**इंद्रजीतः**—( वाचतांना उसासा टाकून ) सगळ जाणतों आहें मी बेन.

**गंगाः**—आज मी ढोकळे केले आहेत. पाठवीन हं तुम्हाला.

**इंद्रजीतः**—वा· छान.

**गंगाः**—( वाचीत असतां ) तिच्या बद्दल आतां तुम्ही कोणतीच आशा बाळगूं नका.

**इंद्रजीतः**—बेन, या बाबतींत मी केव्हांच आशा बाळगली नव्हती. ( थोडावेळ दोघें वाचतात ) माझ्या सर्व आशा-आकांक्षा पुऱ्या झाल्या आहेत. ( सुस्कारा टाकतो. )

**गंगाः**—मी जाणतें सारं ! ( थोडा वेळ दोघें वाचीत असतां गौरीशंकर येतो. )

**गौरीशंकरः**—( मोठ्या आवाजानें ) मास्तर, तुमच्या जवळ माझी ' प्रियतमाने आरती ' आहे ना ? ती द्या पाहूं.

**इंद्रजीतः**—( वर पाहून हंसत असतो ) अजून मी वाचलं नाहीं. वाचून झाल्यानंतर देतों.

**गौरीशंकर** (अधीरपणें) मला आत्तां पाहिजे. मला ती शशिबेनला द्यायची आहे. ती आली आहे इथं.

**गंगाः**—कोण ? शशीकलाबेन ? मनहरशेटची पुतणी ?

**इंद्रजीतः**—कोण ही ?

**गौरीशंकरः**—शशिबेनला ओळखत नाहीं तुम्ही ? स्त्रीदेवतेची ही संस्कारमूर्ति एकदां पहावी नि ओळखून घ्यावी—अशी आहे.

**गंगाः**—इथं कुठं ? इथं आली आहे ती ? जरा थांबा. मी भेटून येतें. मला ओळखते ती. ( उठून जाते. )

**इंद्रजीतः**—( उठून टेबलाच्या खणांत पहात असतां ) ती बी. ए. झाली आहे. नाहीं ? केव्हां झाली बी. ए. ?

**गौरीशंकरः**—गेल्या वर्षी. तिच्या विद्वत्तेची गोष्ट काय सांगावी ! विद्या तिच्या वाणीतून वहाते आहे !-डोळ्यांतून तळपते आहे—

**इंद्रजीतः**—( टेबलाचा खण चाळित असतां ) कुणाची मुलगी ही ?

**गौरीशंकरः**—आईबाप वारले तिचे. तिचे काका मनहरलाल शेट–त्यांच्या कडे असते ती.

**इंद्रजीतः**—( पुस्तक शोधित ) लग्न झालं आहे का तिचं ?–कीं अविवाहीत आहे ?

**गौरीशंकरः**—( गर्वानें ) कौमार्यव्रत स्वीकारलं आहे तिनं.

**इंद्रजीतः**—पैसेवाली आहे ?

**गौरीशंकरः**—हो–नि तिचे काकाही फार श्रीमंत आहेत–नी तीच त्यांची वारस आहे.

**इंद्रजीतः**—हं सापडलं–( पुस्तक काढून घेऊन बसतो. )

**गौरीशंकरः**—द्या तर–( गंगा व शशिकला येतात. इंद्रजीत हातांत पुस्तक घेतलेला–उभा राहातो. गौरीशंकर हंसत हंसत स्वागत करतो. )

**इंद्रजीतः**—या–या बेन !

**गंगाः**—हे इंद्रजीत–मास्तरसाहेब, शिवगौरीबेनचे पती. ( इंद्रजति सखेद-पूर्वक पहात राहातो. )

**शशिः**—कसं काय ? गौरीशंकर तुमच्यासंबंधीं वारंवार बोलत असतात.

**इंद्रजीतः**—( केविलवाणें हंसत असतां ) आपण आलांत–माझं घर पावन झालं.

**गौरीशंकरः**—शशिबेन–हें माझं काव्य ! ( पुस्तक देतो. )

**शशिः**—( हंसत ) प्रियतमेची आरती ! हं, असंच लिहीत राहाल तरच तुम्ही सगळ्यांना टक्कर द्याल. गंगाबेन, माहीत आहे तुम्हांला ? गौरीशंकर फार मोठे कवि आहेत ! सुंदर लिहितात–( गौरीशंकर खुलतो. )

**गंगाः**—गौरीभाई कवि आहेत हें मला माहीत आहे, पण त्यांचं लिखाण मी अजून कांहींच वाचलेलं नाहीं.

**इंद्रजीतः**—बसा–बसा. फार आनंद झाला. कविराज–बसा, शशीबेन, ठीक आहे ना !

**शशिः**—मास्तरसाहेब, पहा कसं तें ! परवांच मी शिवगौरीबेनना भेटलें. तुम्ही त्यांना बोलावित नाहीं हें बरं नाहीं.

**गौरीशंकरः**—शशीबेन–ते फार मोठं प्रकरण आहे. आम्ही सगळे या एकाच चाळीत असतों–मास्तरना किती वेळा म्हणतो, कीं शिवगौरीबेनना बोलवा म्हणून—

**शशिः**—( गोड हंसून ) तुमच्या सारख्यानं एका स्त्रीचा त्याग करावा ! मग तुम्ही दुसऱ्याला काय शिकवणार ? सुशिक्षित माणसानींच स्त्रियांना मान दिला पाहिजे.

**इंद्रजीतः**—( कापत असलेले ओंठ दाबीत ) मी कुठं नाहीं म्हणतों ? ( सुस्कारा टाकतो. )

**गौरीशंकरः**—असं नाहीं मास्तर. एकदां याच त्यांना घेऊन. आज उद्यां म्हणतां किती दिवस झाले ?

**इंद्रजीतः**—एक दिवशीं येतोंच घेऊन ! ( डोळ्यानें दिलगिरी प्रदर्शित करतो. )

**शशि**—बिचारी हिंदू स्त्री, कधीं नाहीं म्हणेल ? तुम्हां पुरुषांना स्त्रीहृदयाची पर्वाच नाहीं.

**गौरीशंकरः**—शशीबेन, पुरुष सामान्यतः नवीन स्त्रियांच्या भावना जाणून घेण्याचा प्रयत्नच करीत नाहीं—

**गंगाः**—एका हातानं कधीं टाळी वाजेल का ?

**शशिः**—मास्तरसाहेब, झाल्या गोष्टी होऊन गेल्या. आतां हें काम तुम्हीं माझ्यावर सोंपवा. मी आणतें शिवगौरीबेनना.

**इंद्रजीतः**—( निराधारपणें ) मी कधीं नाहीं म्हणतों का गौरीभाई ? मी कधीं नाहीं म्हटलं का ?

**गौरीशंकरः**—( गर्वानें ) मास्तर, बेफिकीर रहा. शशीबेन मनांत आणतील तर केव्हांच त्यांना आणतील ! त्यांच्यांत अद्भुत प्रेरणाशक्ति आहे.

**गंगाः**—एवढंच पहा—नाहींतर म्हणतात ना ' पेट चोळीने शूळ उभी नही थाय. '

**शशिः**—तसं नाहीं व्हायचं गंगाबेन ! बरेच वेळां गैरसमजानंच एकमेक एकमेकांचे शत्रू बनतात. आजच संध्याकाळीं शिवगौरीबेन माझ्याकडे यायच्या आहेत. गौरीशंकर, तुम्हीही या त्यावेळीं. मास्तरसाहेब, तिची समजूत घालून पहा ना एकदां !

**इंद्रजीतः**—बराच प्रयत्न केला—

**शशिः**—अलिकडच्या स्त्रियांच्या जशा नवीन भावना उमलल्या आहेत तशाच अभिलाषाही नव्या आहेत. त्यांनाही आत्मविकास पाहिजे आहे—एवढं लक्षांत ठेवून जर पुरुष वागतील तर हा बखेडा केव्हांच माजणार नाहीं. चला. मास्तरसाहेब, येतें हं! ( सगळे उभे राहतात. वल्लभरामसह दुर्लभराम प्रवेश करतो. )

**दुर्लभः**—इंद्रजीत आहे का ? नि ही मंडळी कुठली ? या कोण बाईसाहेब ? ( शशीकलेकडे तिरस्कारानें पाहात असतो )

**इंद्रजीतः**—या दुर्लभरामभाई ! या काका !

**दुर्लभः**—( शब्द चावीत ) पण या बाईसाहेब कोण ?

**इंद्रजीतः**—( चष्मा काढून पुसत असतां ) या—

**शशिः**—कां !—काय काम आहे ? साहेबजी— ( जाऊं लागते. दुर्लभराम बसतो, वल्लभराम टेबलावरचे कागद पहात राहातो )

**गौरीशंकरः**—( शशीकडे पाहून हंसत ) शशीबेन, मी संध्याकाळीं येतों.

**शशिः**—जरूर. साहेबजी. ( जातो )

**दुर्लभरामः**—अरे पण ए मास्तर—जरा इकडे तर ये. असा गळेपडूपणा करतां आहांत. अशी ती आहे तरी कोण ?

**गौरीशंकरः**—Mind your own business! ( रागानें निघून जातो. )

**गंगाः**—भाई—

**दुर्लभः**—पण मोटीबेन, तुम्हीं कोण आहांत?

**गंगाः**—जातें मी—[ तोऱ्यानें निघून जाते. ]

**दुर्लभः**—[ वल्लभच्या हातावर टाळी देऊन ] हा-हा-हा-हो-हो-हो ! वल्लभरामभाई, सगळे गेले!

**वल्लभरामः**—( कंटाळून ) दुर्लभरामभाई, करा मूळकथेला सुरुवात.

**दुर्लभः**—इंद्रजीत—आम्ही कांहीं बोलायला आलों आहोंत तुझ्याकडे. ( इंद्रजीत शरीराची गठडी करून बसतों. ) हे तुझ्या कुटुंबापैकीं वल्लभरामभाई, नि शिवलीच्या कुटुंबापैकीं मी—आम्ही वडील माणसं आहोंत. आतां बोल, तूं काय करणार आहेस ? ( पान चावीत ) काय वल्लभरामभाई, बोललां नाहीं ?

**वल्लभः**—हां—दुर्लभरामभाई.

**इंद्रजीतः**—पण कुणाचं काय ?

**दुर्लभः**—[ शब्द चावीत ] कुणाचं? कुणाचं म्हणजे ! तुझं नि शिवलीचं !

**इंद्रजीतः**—[ धांदरटपणें ] पण मी काय करूं ?

**दुर्लभः**—तूं कांहीं करीत नसलास तर मी करतों थोडी हालचाल ! काय वल्लभरामभाई, बोललां नाहीं ?

**वल्लभः**—हां दुर्लभरामभाई.

**दुर्लभः**—बोल—बोल—बायकोला केव्हां बोलावणार आहेस ? ( शब्द चावीत ) केव्हां बोलावणार आहेस तुझ्या बायकोला ? सांग.

**इंद्रजीतः**—मी कुठं नाहीं म्हणतों ?

**दुर्लभः**—मग कोण नाहीं म्हणतं ?

**इंद्रजीतः**—[ गळगळून ] ती यायला तयार नाहीं. मी तर डबडीमावशी-मार्फत सांगून पाठवलं, नि गिगामावश्यालाही आणायला पाठवलं—

**दुर्लभः**—[ चावीत ] ती येत नाहीं म्हणते ! पण तूं कां बसून राहिला आहेस ?

**इंद्रजीतः**—पण मी काय करूं ?

**दुर्लभः**—[ चावीत ] काय करूं, काय करूं काय करतोस ? झिंज्या पकडून घेऊन ये. मर्द आहेस कीं कोण ?–नुसते डोळे वटारले तर बायको आली पाहिजे धांवत. काय वल्लभरामभाई, बोललां नाहीं ?

**वल्लभः**—हां—दुर्लभरामभाई.

**इंद्रजीतः**—पण तिला तशी कशी आणूं ? ती नाहींच म्हणते–मग काय करणार ? ( सुस्कारा टाकतो. )

**वल्लभः**—( वसूकन् अंगावर येतो. इंद्रजीत चमकतो ) हं–बोलला–बायल्या ! ( गुरगुरतो. )

**दुर्लभः**—इतकीं वर्षे झालीं तरी तुझी बायको घरीं येणार नाहीं ? सीध्या मार्गानें यायला तयार नसेल तर जबरदस्ती करून आण. अशानं आम्हांला खालीं मान घालायचा प्रसंग आणतो आहेस, तें कळतं आहे का तुला ? ( डोळे वटारून पहात असतो. )

**वल्लभः**—( कंटाळून ) माझा भाऊ तिथं बसल्या बसल्या बोंबाबोम्ब करतो आहे !

**दुर्लभः**—किती मान खालीं घालावी लागते आहे मला ? काय वल्लभराम-भाई, बोललां नाहीं ?

**वल्लभः**—हां–दुर्लभराममाई! ( इंद्रजीत घाम पुसूं लागतो )

**दुर्लभः**—( निश्चयानें ) तूं कंबर कसून तयार हो.

**इंद्रजीत**—( धीमेपणानें ) तयार आहें मी !

**दुर्लभः**—( अधीरपणें काठी पकडून ) तयार आहें ? तयार आहें म्हणतो नि बायल्या सारखा बसून राहिला आहे ! ऊठ. [ तारवटल्या डोळ्यानें इंद्रजीत पहात राहातो. ] ऊठ–कंबर बांध–जा आणि घेऊन ये.

**इंद्रजीतः**—[ असमाधानपणें ] आणि नाहीं आली तर ?—

**दुर्लभः**—एका गाडींत घालून पकडून घेऊन ये–आणि बंद खोलींत कोंडून ठेव–मार टाळं ! काय वल्लभरामभाई, बोललां नाहीं ?

**वल्लभः**—हां दुर्लभराममाई,

**दुर्लभः**—समजलास ? उठवून आण, हरण करून घेऊन यें.

**इंद्रजीतः**—( दीनवाणा चेहेरा करून ) नि पुन्हां गेली तर ?—

**दुर्लभः**—कशी जाते ? मगदूर आहे का ?

**वल्लभः**—[ गुरकावून ] मगदूर काय लागली ?

**इंद्रजीतः**—[ निराधारपणें बडबडतो ] मगदूर काय लागली ? नंतर ?

**दुर्लभः**—[ शब्द चावीत ] नंतर ? नंतर काय ?

**इंद्रजीतः**—[ घसा साफ करून ] तिच्या भावानं फौजदारी केली तर ?

**वल्लभः**—[ रागानें ] तुझ्यावर फौजदारी होईल म्हणून आम्ही हा कलंक सहन करावा का ? उंह !

**इंद्रजीतः**—[ हंसत ] पण फौ--ज-दा-री ! फौजदारी.

**दुर्लभः**—हा--हा--हा--हा. मला होतंच हें माहित ! फौजदारी ! वल्लभ-रामभाई, बोलवा वकीलसाहेबांना, खालीं गाडींत बसले आहेत. थांबा हं. मीच खिडकीतून हांक मारून बोलावतों. ( खिडकीकडे जाऊन ) वकीलसाहेब, अहो वकीलसाहेब, जरा वर या. ( परत येऊन बसतो. )

**इंद्रजीत,**—( एकदम वर पाहून ) काय चालवलं आहे ? मला काहींच समजत नाहीं.

**दुर्लभः**—( ठासून ) मला सगळं समजतं आहे !

**कुंदनलालः**—( प्रवेश करून ) काय मिस्टर इंद्रजीत, कसं काय ?

**दुर्लभः**—कसं काय-काय विचारतां वकीलसाहेब ? तोंड पहा ना याचं ! बायको पळून गेली-करतो काय ? हत् भेकड !

**कुंदनः**— बोला, माझं काय काम आहे इथं ?

**दुर्लभः**—हा इंद्रजीत शिवलीला पळवून आणणार आहे. पण त्याला फौजदारीची भीति वाटते. बोला, तुमचं काय मत आहे ?

**कुंदनः**—( डोकं हालवून ) खरं आहे त्याचं म्हणणं. मुंबईत जोरजुलूम करायला जाल तर फार महाग पडेल.

**इंद्रजीतः**—मी नाहीं सांगितलं ?

**दुर्लभः**—( वेडावीत ) मी नाहीं सांगितलं !–( कुंदनलालला ) पण त्याला उपाय काय ?

**कुंदनः**—( डोकं खाजवून ) असं करा–तिला मुंबईच्या बाहेर–वांद्रा किंवा सांताक्रूझकडे घेऊन चला नि–तिथून पळवून न्या.

**इंद्रजीतः**—परत जायला लागली तर ?

**कुंदनः**—[ शांतपणें ] त्याला मी काय करणार ! शिवगौरी परत ही जाणारच.

**इंद्रजीतः**—मी नव्हतं सांगीतलं ?

**दुर्लभः**—मी नव्हतं सांगीतलं !–कपाळ तुझं नव्हतं सांगीतलं ! परत कशी जाते ! नीट नजर ठेव.

**इंद्रजीतः**—हें मुंबईत नाहीं जमणार !

**दुर्लभः**—बडोदा राज्यांत घेऊन जा. तिथं कोण येणार ? मग काय ?

**कुंदनः**—हां हा, मग नाहीं कांहीं अडचण !

**इंद्रजीतः**—( गळगळून ) पण मी तिथं कसा जाऊं ? माझी नोकरी !—

**दुर्लभः**—अरे तुझी नोकरी गेली जहान्नममधें ! रजा घे–राजीनामा दे–विष खा–काय वाटेल तें कर. नवसारीमधें माझ्या भागीदाराचं एक घर आहे–तिथं जाऊन रहा.

**इंद्रजीतः**—नाहीं ऐकलं तिनं तर ?

**दुर्लभः**—बायकोची जात–नाहीं म्हणते म्हणते काय ? कशी नाहीं म्हणेल ? तूं तर अगदीं बायल्या नि बायल्याच राहिलास अजून.

**कुंदनः**—( जरा हंसून ) आपल्यामधें एक म्हण आहे खरी, कीं 'बैरी रहे तो आपथी ने जाय तो सगा बापथी.'

**दुर्लभः**—वा रे वा वकीलसाहेब ! पहा तर खरं–आम्ही म्हातारे सांगतों त्यांत कधींच अडचण येणार नाहीं.

**कुंदनः**—वाहवा ! मग माझं आतां कांहीं काम आहे का ?

**इंद्रजीतः**—( निराधारपणें ) मग मी काय करूं ?

**दुर्लभः**—( चकीत ) हजामत कर ! ऊठ, उभा राहा ! नि शिवलीला पळवून आणा. दुसरं काय ! कधीं आणणार ?

**इंद्रजीतः**—( डोकें खाजवीत ) पण तिला वांद्याला किं सांताक्रूझला कशी नेऊं ?

**दुर्लभः**—वकीलसाहेब, आतां द्या याला सल्ला !

**कुंदनः**—( हंसत ) हेंही मीच सांगितलं पाहिजे का ? काय ?

**दुर्लभः**—हां-हां.

**कुंदनः**—बरं. कांहीं दिवसांनीं मनहरलालशेट आपल्या जुहूवरच्या बंगल्यावर कांहीं निवडक स्नेह्यांना बोलावणार आहेत. तिथं शिवगौरी आल्याशिवाय राहाणार नाहीं. त्यानंतर काय करायचं तें तुमचं तुम्हीच पहा !

**इंद्रजीतः**—पण तिला पळवून घेऊन कसा जाऊं ?

**कुंदनः**—( हंसत ) तें मी कसं सांगूं ! कोर्टांत खटला गेला तर मला नको त्याची झळ लागायला !

**दुर्लभः**—अरे, तें काम माझं. मुंबईत मवाल्यांना काय तोटा ? बेट्या इंद्रजीत, तूं घाबरूं नकोस. मी सगळं करीन. चला वकीलसाहेब, हें तर ठरलं नक्की. इंद्रजीत, आतां तूं कंबर बांध, समजलास ? काय वल्लभरामभाई, बोललां नाहीं ?

**वल्लभः**—( कंटाळून ) हां दुर्लभरामभाई.

**दुर्लभः**—चला तर. ( जातो )

**वल्लभः**—हां—चला. ( जातो )

**कुंदनः**—साहेबजी. ( जातो )

**इंद्रजीतः**—( निस्तेज नजरेनें पाहात असतो ) साहेबजी !—[ डोक्यावर हात घेऊन सुस्कारा टाकतो. धीमेधीमे बोलत असतो. ] कंबर कसून जाऊं?—मवाली आणायला—गुन्हा करायला—तिला पळवून न्यायची—नवसारीला जाऊं?—कुलूप लावलेल्या खोलींत कोंडून ठेवायची ! इतकी उलाढाल करायची ! फौजदारी होईल. [ चष्मा पुसतो ] जेलमधेंही जावं लागेल ! पण कुलाला कलंक लागेल !—अब्रूवर पाणी पडेल--काका रागावतील ! कांहींतरी केलं तर पाहिजे ? तिनंही कंबरेचं सोडून डोक्याला गुंडाळलं ! ( ओंठ थरथरत )

जबरी बायको ! येईल कीं न येईल ? मानील कीं न मानील ? ( सुस्कारा टाकून ) मग या घरांत धांदलच धांदल ! ( डोक्यावर हात घेवून ) अशांतस्य कुतः सुखम् ? खरं आहे हें ! कुतः सुखम् ? कुतः सुखम् ? ( टेबलांतलि जन्मपत्रिका काढून वाचतो. बोटें घालून मोजतो. ) येईल का ती ?–वृषभ–मिथून–कर्क–एक, दोन, तीन, चार, पांच–अहं: वृषभ, मिथून ( निरुत्साहानें ) येईल–येईल, ग्रहयोग आहे. आली पाहिजे यावेळीं येईल ! ( कपाळावर हात घेऊन बसतो )

**गंगाः**—[ प्रवेश करून ] भाई, हे ढोकळे.

**इंद्रजीतः**—ठेवा तिथं. ( गंगा आंत जाऊन ठेवून येते )

**गंगाः**—काय करतां आहांत ?

**इंद्रजीत**—ग्रहयोग पहातों आहें.

**गंगाः**—( हंसत ) कशासाठीं ? शिवगौरी येईल कीं न येईल तें पाहातां आहां ?

**इंद्रजीतः**—हं. मला आतां कांहीं तरी केलं पाहिजे. कंबर बांधली पाहिजे. ती कशी येत नाहीं ? [ खिन्न आवाजानें बोलत असतो. ]

**गंगाः**—भाई, पत्रिका काय म्हणते ?

**इंद्रजीतः**—[ सुस्कारा टाकून ] ती येईल असं म्हणते आहे.

**गंगा**—मग आली तुझी पनोती भाई !

**इंद्रजीतः**—कां ?

**गंगाः**—असं स्वस्थ बसणं तुम्हाला आवडत नाहींसं दिसतं !

**इंद्रजीतः**—[ चमकून ] असा स्वस्थ कसा बसूं गंगाबेन ! कुटुंबाची अब्रू ! कुटुंबाची अब्रू ! [ रडत रागानें ] त्याचा कांहीं विचार आहे का तुम्हांला ?

**गंगाः**—जळो ती कुटुंबाची अब्रू ! 'धणीने सुझे ढाकणीमा' चला, उठा' स्नान करा. शाळेची वेळ झाली.

**इंद्रजीतः**—कुटुंबाची अब्रू ! कुटुंबाची अब्रू ! ( डोकं हालवून ) शिव शिव शिव !—शांतिः शांतिः शांतिः

[ पडदा पडतो ]

# अंक दुसरा

## प्रवेश पाहिला

( **वेळः** दहा दिवसानंतर एका संध्याकाळीं पांच वाजतां-मनहरलालच्या बंगल्यातील शशिकलेचा दिवाणखाना-शशिकला पियानो वाजवीत आहे. मनहरलाल दारांतून पहात असतो. जरा वेळानें पुढें येतो. )

**मनहरः**—शशि !

**शशिः**—( वर पाहून हंसते ) जरा थांबा काका ! एवढी गत पुरी करतें. ( मनहर तिच्याजवळ येऊन उभा राहातो. शशि गत घाईनें पुरी करते. ) काका ! तुम्ही संगीत कां नाहीं शिकला ?

**मनहरः**—शशि ! ज्यावेळीं संगीत शिकायला मला फुरसद होती तेव्हां पैसा नव्हता, आतां पैसा आहे पण फुरसद नाहीं.

**शशिः**—संगीताशिवाय जीवन संपूर्ण नाहीं होत.

**मनहरः**—( हंसत ) संपूर्ण जीवन माझ्यासाठीं घडयलेलंच नाहीं.

**शशिः**—( हंसत ) माझं जीवन संपूर्ण आहे, माझ्याजवळ पैसा-सौंदर्य-स्वातंत्र्य, सगळं कांहीं आहे.

**मनहरः**—अजून त्यांत उणीव आहे. जेव्हां नवरा-मुलंबाळं यांच्या प्रेमांत अडकली जाशील तेव्हांच तुझं जीवन पूर्णत्याला येईल.

**शशिः**—( हंसत ) लग्न नि प्रपंच यांतच सुख सामावलं आहे असं तुम्हाला कां वाटतें कुणाला ठाऊक ! जरा थांबा. चहा मागवतें. ( बेल दोन वेळा दाबत )

**मनहरः**—पुरुष किंवा स्त्री या दोहोंपैकीं कुणाचंही जीवन प्रेमाच्या संसाराशिवाय संपूर्ण होत नाहीं.

( रामा चहा ठेऊन जातो. दोघेही बसतात. )

**शशि:**--प्रेमाचा संसार म्हणजे स्त्रीचं कारागृह !

**मनहर:**—शशि ! कांहीं कांहीं वेळां अशी मनोवृत्ति बनलेली असते, कीं त्यावेळीं हक्काची तक्रार करणं मनाला पटत नाहीं, नि स्वातंत्र्य हा शब्दच कर्णकटू लागतो. ही मनोवृत्ति म्हणजेच प्रणय. या गोष्टी समाजायला अजून तुला थोडा अवधि आहे.

**शशि:**--काका ! पुरुषांना आत्मविकासासाठीं स्वातंत्र्य पाहिजे नि स्त्रियांना नको वाटतं ? आज जशी मी चार लोकांबरोबर हिंडतें फिरतें आहें, तशी मिसळलें नसतें तर माझी बुद्धि किती संकुचित राहिली असती !

**मनहर:**—खरं आहे तुझं म्हणणं ! पण तेंच स्वातंत्र्य आत्म्याचा-दोन प्रणयी जीवांच्या प्रणयाचा-नाश करतं त्याचं काय ? ( चहा पीतात )

**शशि:**—म्हणजे जिथं प्रेम आहे तिथं स्वातंत्र्य शक्य नाहीं—असंच ना ?

**मनहर:**—जिथं स्वातंत्र्याला जागा मिळाली आहे, तिथं प्रेम संभवतच नाहीं.

**शशि:**—मैत्री तरी शक्य असते ना ?

**मनहर:**—शशि, मी आहें जुनापुराणा माणूस. स्त्री पुरुष एकमेकांचे मित्र होऊं शकतात-प्रणया शिवाय मैत्री होते-हें मला शक्यच वाटत नाहीं. दोघांनाही एकमेकांचं आकर्षण वाटतं, एकमेकाबद्दल मोह उत्पन्न होतो ही तुम्हां Palship शोधणाऱ्या प्रयणी जीवांची भूल आहे-ती सार्वत्रिक नियमाला अनुसरून आहे-हा नियम मानवहृदयनिर्मित नाहीं-Biology चा-जनावर शास्त्राचा आहे. या आकर्षणानंतर दोघेही संयम करतील, संस्कारी बनतील नि आडकाठी राखतील तर विशुद्ध राहतील-भाषेचा दुरुपयोग केल्यास अशांना एकमेकांचे मित्रही म्हणतां येईल, पण एकादी स्त्री पुरुषाकडे किंवा पुरुष स्त्रीकडे आकर्षिला जातो यावरूनच पृथ्वीचे गाडं वाटोळं फिरत आहे हें सिद्ध होतं. याचा मूळ हेतू एकच-मानवजातीची वाढ.

**शशि:**—तुम्हांला सर्व असंच दिसतं काका ! व्यापारी लोकांच्या सहवासानं तुमची भावनात्मकता मरून गेलीय.

**मनहरः**—नाहीं पोरी ! जो तुला हिरा वाटतो आहे, तो माझ्या दृष्टीनं निखारा ठरतोय. ( विनोदानें ) हा कुंदनलाल, गौरीशंकर, तनसुखलाल-हे तुझे जानी दोस्त असं तुला वाटतं ! वेडे, माझ्या व्यवहारी भाषेंत सांगू ? हे सगळे कांचेच्या कपाटांतला साखरेचा हत्ती पाहून लाळ घोटताहेत. कपाटाची कांच केव्हां फुटते नि हत्ती तोंडांत केव्हां पडतो, याची हे सगळे वाट पाहाताहेत. हे सगळे तुला पत्रं पाठवतात तीं वाच ना ! प्रत्येक ओळन् ओळ प्रणयानं भरून गेलेली दिसेल. मात्र उघड उघड लिहिण्याचा प्रामाणिकपणा किंवा हिंमत या लेखकांत दिसून येत नाहीं, एवढं खरं.

**शशिः**—( कानावर हात ठेवून ) काका ! तुम्ही अगदीं जंगली आहांत. कुंदनलाल नि गौरीशंकर किती निर्मळ आहेत. बसले, बोलले, हंसले, म्हणजे काय त्यांच्या तोंडाला पाणी सुटलं ?

**मनहरः**—नुसते बसतात, बोलतात, हंसतात असं नाहीं. पण जेव्हां एक—' पाल ' शोधतो, दुसरा—प्रेरणामूर्ति पाहतो, तिसरा—सरस्वतीदेवीला नमस्कार करतो, एकाच स्त्रीमधें सारीं रूपं शोधतो, तेव्हां त्याचा अर्थ काय समजायचा ? सृष्टीची उलथापालथ चाललीय असंच ना ? तुझ्यासारख्या कितिक मुली केवळ अज्ञानामुळं या चक्रांत सांपडून चिरडून गेल्या आहेत !

**शशिः**—किती संशयखोर आहांत तुम्ही काका ! आम्हीं कोणत्या जातीचे स्त्री–पुरुष आहोंत तें तुम्हांला समजतच नाहीं. आमची नि आमच्या मित्रांची विशुद्ध मनोवृत्ति नि भव्य आदर्श, यांचं रहस्य तुम्ही पारखलं नाहीं.

**मनहरः**—Pure and simple nonsense! शशि, बस्स झालं. तुझ्या बुद्धि नि आदर्शा प्रमाणें तूं वागत जा–मी काय नको म्हणतों ? पहा, आजच तुझ्यासाठीं तो शेजारचा बंगला एक लाख दहा हजारांना विकत घेतला. स्वतःच्या स्वतंत्र घराशिवाय तूं स्वतंत्र कशी होणार ?

**शशिः**—Thank you, thank you काका ! सगळी मिळून किती आहे माझी इस्टेट ?

**मनहरः**—आठेक लाख ! ( विचित्रपणें हंसतो )

**शशिः**—( कांहींशा इच्छेनें जवळ येऊन ) काका ! मी वेगळी रहायला लागलें म्हणजे तुम्हांला इथं चैन पडणार नाहीं–नाहीं ?

**मनहर**—तुझ्यावांचून अडायला मी काय दुबळा आहें ? तुला मुलं झालीं म्हणजे त्यांना आणून इथं ठेवीन बरं शशि !

**शशिः**—( तिरस्कारानें ) काका–पुन्हां तेंच ! तुम्हांला हजार वेळां सांगितलंय, कीं मी लग्न करणार नाहीं-नाहीं नि नाहींच.

**मनहरः**—वाहवा ! पहा ! मी सांगतों ! कीं एक दिवस कुणीना कुणी तुला भेटेल आणि त्याच्याशीं तूं लग्न करशील.

**शशिः**—पण काका ! माझ्या वाडिलांची किती इस्टेट होती ?

**मनहरः**—( हंसून ) फार थोडी. सगळा हिशोब देईन ना तुला-(गाडीचा आवाज ऐकूं येतो. ) कोण आलं ?

**शशिः**—शिवगौरी असेल, She is a nuisance काका ! तिचा नवरा अगदीं गरीब गाय आहे बिचारा !

**मनहरः**—( हंसून ) आजकालच्या स्त्रीला स्वातंत्र्य मिळेल तें अशाच नवऱ्याकडून !

**शशिः**—Dont talk nonsense !

**भैयाः**—( प्रवेश करून ) बाईसाब, शिवगौरीबेन आया है.

[ शिवगौरी येते. ]

**शशिः**—( पुढें येऊन ) शिवगौरीबेन, या.

**शिवगौरीः**—वाटलं, यावं शशीबेनना भेटून.काल नव्हतें ना भेटलें! कोण ? मनहरलालशेटही आहेत ?

**मनहरः**—( ऐसपैस बसला असतां ) जिथं स्त्रीस्वातंत्र्याचा पुरस्कर्ती असतो तिथं स्त्रियांचा वैरी हा असायचाच ! या, बसा. शशी, यांना चहा दे नि मलाही दे आणखी थोडा चहा. [ तो पेला पुढें करतो त्यांत शशी चहा ओतते. ]

**शिवगौरीः**—( हंसत हंसत मनहरजवळ येते ) तुम्ही असं कां हो बोलतां ? तुम्ही स्त्रियांचे वैरी आहां हें मला पटतच नाहीं.

**मनहरः**—स्त्रियांचा वैरी नसतों तर केव्हांच लग्न करून मोकळा झालों असतों. तुमच्यासारख्यांच्या शेजारीं बसून असा चहा पीत बसलों असतों का ?

**शिवगौरीः**—मला समजतं तुमचं बोलणं. स्त्रियांना कुणी सीध्या मार्गानं मान देतं तर कुणी आडवळणानं—नाहीं शशीबेन ?

**शशिः**—कांहीं कांहीं वेळां काका अगदींच टाकून बोलतात, जसं कांहीं स्त्री म्हणजे कचराच.

**मनहरः**—अग कचरा बरा ! वाळलेला असला तर पाणी तापवायला तरी उपयोगी पडतो—

**शिवगौरीः**—( हंसत ) तोंडाला येईल तें बोला ना ! तुम्हाला स्त्री आवडत नाहीं हें मी मानायलाच तयार नाहीं. तुम्हांला योग्य अशी कुणी मिळाली नाहीं म्हणून ! [ जरा थांबून ] कुठंसं वाचलंय मी, कीं पुरुष किंवा स्त्रीला जन्माला घातलं जातं तेव्हांच जोड्या ठरवून टाकल्या जातात त्यांच्या ! त्यानंतर ती जोडी एकत्र येणं नशीबावरच अवलंबून असतं.

**मनहरः**—माझी जोडी ठरावायला तो विसरला असेल. ( हंसून ) हां—हां या शशीचा जोडीदार कोण आहे—आहे माहीत ! संभाळून रहा हं !

**शशिः**—माझी जोडी ठरविणाऱ्या परमेश्वरालाच मी ठिकाणावर आणणार आहें.

**मनहरः**—शिवगौरीबेन, तुमची जोडी ठरलेलीच आहे नाहीं ?

**शिवगौरीः**—( मान खालीं घालून ) हें विचारायला का हवं ?

**मनहरः**—पण हें समजायचं कसं ? आजकालच्या अफलातुनी जीवाच्या जोड्या कशा ओळखायच्या तें तर सांगाल.

**शिवगौरीः**—( मुरडून ) हें तर नजरानजर होतांच कळतंय. ( डोळे मिचकावून ) शब्द झणकला कीं जीव आपोआप जागा होतो.

शशिः—( खदखदा हंसून ) काका, हें तुमच्या सारख्या रुक्ष माणसाला नाहीं कळायचं.

मनहरः—( हंसतो ) पण त्यानंतर ?—दोघंजण एकत्र बसून तसल्या गोष्टीच करतात कीं दुसरंच कांहीं ?—

शिवगौरीः—छे, गोष्टीसुद्धां नाहीं करीत !

शशिः—या गोष्टी आमचा गौरीशंकर चांगल्या देईल समजावून. त्यानं 'मूक संवनन' नांवाचं काव्य रचलं आहे. हं. तोच आला वाटतं ?

मनहरः—त्याला संवनन करण्याखेरीज दुसरा धंदा आहे का ?

शशिः—Dont be horrid ! काय कवी, कसं काय ?

गौरीशंकरः—( हंसत हंसत येतो ) कसं काय शशीबेन ? ( इतरांना पाहून गंभीर होतो ) काय शेट, काय बेन ?

मनहरः—काय कविराज ? तुमच्या 'मूक संवनना' बद्दल आम्ही बोलत होतों.

गौरीशंकरः—( तोऱ्यानें ) सूक्ष्म कवनं संस्कारी जीवांसाठीं असतात.

शशिः—( गुणगुणते ) 'रस सागरने आरे सखी आवजो रे—।

मनहरः—कवि ! भूक लागली कीं स्वैंपाकीण हवी. नि आजारी पडलं तर नर्स हवी. यांची अदलाबदल केली तर चालेल का ?

गौरीशंकरः—( तिरस्कारानें ) संस्कारी जीव रसोर्मिवर जीवन कंठीत असतात. समजलं शेट !

मनहरः—अस्सं ! मग मुलंबाळ उपाशी मरूं लागली तर या रसोर्मिच्या खात्यावरचा चेक इंपिरिअल बँक वटावील का ?

गौरीशंकरः—( रागानें पहात ) तुमच्या दृष्टीनं नाहीं जोखला जाणार आमचा माल !

मनहरः—( खदखदां हंसून ) या स्त्रीच्या दृष्टीनं जोखला गेला म्हणजे तुम्ही खूष व्हाल ! चला तुमच्या आध्यात्मिक गोष्टी सुरू करा. ( जातो )

गौरीशंकरः—( समाधानानें ) शशीबेन ! डबक्यांत जसं कमळ उगवतं

तशाच या असल्या वातावरणांत राहूनही तुमच्या तेजाचा प्रकाश तुम्ही पाडतां आहां !

**शिवगौरीः**—मनहरशेट दिसतात तसे रुक्ष नाहींत. त्यांच्या आत्म्याला अजून खाद्य मिळालं नाहीं. एवढंच.

**गौरीशंकरः**—( शशीच्या मुखाकडे एकाग्रतेनें पाहात असतां ) ही शशीबेन असल्यावर दुसरं खाद्य कशाला पाहीजे ! याच्या दृष्टींत संजीवनी भरली आहे. वाणीत प्रेरणा नि गतींत—

**शशीः**—हां. हां. पुरे झाली ही स्तुति कविराज—

**गौरीशंकरः**—स्तुति नाहीं करीत. तें माझ क्षेत्रच नव्हे. मी आहें स्पष्टवक्ता. स्पष्टवक्ता असणं हा कविचा अधिकार मी केव्हांही सोडणं शक्य नाहीं. तुम्ही मूर्तिमंत सरस्वतीदेवी आहां.

**शिवगौरीः**—तुम्ही खरोखर कविराज आहांत !

**गौरीशंकरः**—( हर्षोत्फुल्ल होऊन ) जो आज मी आहें तो केवळ शशीबेनच्या अंतःस्फुर्तिमुळं.

**शशिः**—गौरीशंकर ! तुमच्या शक्तीचा तुम्ही अपव्यय करतां आहां. जें तुम्ही लिहितां ते स्वताच्याच अंतःस्फुर्तिमुळंच लिहितांहां !

**गौरीशंकरः**—नाहीं, शशीबेन, नाहीं. जर तुमची प्रेरणा नरसिंहरावांना मिळती तर ते philological lectures लिहिते ना ! जर न्हानालालना मिळती तर ते स्वतःची कर्मकहाणी गुजरातच्या लोकांसमोर वेडेपणानं वदवून आपलं हंस करून घेतें ना ! जर खबरदार कवींना मिळती तर ते मोटारचा धंदा करते ना—

**शशिः**—( खदखदा हंसून ) हां-हां. पुष्कळ-झालं पुष्कळ-झालं. मॅड होईन मी गौरीशंकर ! तें ' पण आत्माना ऊल्लासनी कांइ होंस जों ' जरा शिवगौरीबेनना ऐकवा ना—

**गौरीशंकरः**—( खांकरून )

वहाली ! आत्मना उल्लासनी कांई होसजो,
वहाली ! रसना विनिमय—

**कुंदनलाल**:—( प्रवेशकरून ) काय शशीबेन, येऊं का ?

**शशि**:—( पुढें जाऊन हात जोडून ) या, या, कुंदनलाल. या, बसा.

**कुंदन**:—( हंसून ) जरा लौकर सुटका झाली आज—तेव्हां म्हटलं शशीबेनकडे लवकरच जावं, कसं काय शिवगौरीबेन ? ( बसतो )

**शिवगौरी**:—ठीक आहे.

**शशि**:—हे मिस्टर गौरीशंकर-कवी आहेत नि एल्फिन्स्टन् कॉलेजचे फेलो आहेत—

**कुंदन**—( तिरस्कारानें ) I see ! कसं काय ?

**गौरीशंकर**:—( बेफिकीरीनें ) ठीक, आज कामांत दिसतां शशीबेन ! मी जातों तर.

**शशि**:—( उभी राहून ) असं—जातां ?

**गौरीशंकर**:—हां—साहेबजी, ( जाऊं लागतो. शशिला ) ही मंडळी यायची होती तें मला सांगायचं होतं !

**शशि**:—एक्स्क्यूज मी ! मला नव्हतं माहीत हे सारे यायचे होते तें.

( गौरीशंकर तोऱ्यांत निघून जातो )

**शिवगौरी**:—काका गेले ते गेलेच वाटतं ! चला—मीही जातें !

**शशि**:—अंहं—जरा बसा ना. काय कुंदनलाल, विधुबेन कशा काय आहेत?

**कुंदन**:—( खिन्नतेने ) ठीक आहे शशीबेन.

**शशि**:—त्यांना आणणार होतां ना ?

**कुंदन**:—तिला तुम्ही ओळखत का नाहीं ? घरांतून बाहेर पडण्याचाच कंटाळा तिला.

**शशि**:—कुंदनलाल ! तुम्ही फार स्वार्थी आहांत. विधुबेनच्या सहवासांत तुम्ही हवे तसे रंगून जात नाहीं. एकाद दिवशीं त्यांना घेऊन चांदण्या रात्रीं-समुद्राच्या तीरीं—एकांतांत—

**कुंदन**:—सामान्य स्त्रीच्या सहवासांत कसला आनंद मिळणार !

**शिवगौरी**:—खरं आहे तुमचं म्हणणं कुंदनलाल ! अशा प्रसंगीं अनुरूप व्यक्तीचा सहवास मिळावा लागतो.

**कुंदनलाल**:—Exactly ! (शशीकडे पाहून) अनुरूप व्यक्तीचा सहवास–Exactly. अनुरूप व्यक्तीच्या सहवासाविना सारं व्यर्थ आहे. अशा जगण्याला जीवन म्हणा हवं तर–पण तें जीवन नव्हे !

**शिवगौरी**:—(अधीरपणें) चला. शशीबेन, जातें मी.

**शशि**:—अहो बसा–बसा, मला जरा बोलायचं आहे तुमच्याशीं. काकाही येतील इतक्यांत.—कुंदनलाल, तो कायद्याचा खर्डा तयार केलात का ?

**कुंदन**:—हां–येत्या सोमवारीं जरूर देईन. आठ दिवस झाले, तेंच काम करतोंय. (उत्साहानें) हिंदू स्त्रियांची स्थिती शास्त्रकारांनीं किती हीन केलीय !

**शिवगौरी**:—(थोड्या अधीरपणें) आम्ही तुम्हांला सहा सहा महिने विनवीत होतों, पण तुम्ही काहींच केलं नाहीं. आतां शशीबेननीं मनावर घेतलं. त्याबरोबर तुम्ही काम हातांत घेतलं ! त्यांच्या प्रेरणेमुळं तुम्हांलाही उत्तेजन मिळालं.

**कुंदन**:—तसं नव्हे. मी यापूर्वीच सुरवात केली होती.

**शशि**:—कुंदनलाल, तुमच्यासारख्यांनीं असेम्ब्लींत जाऊन आमच्या तर्फे लढलं पाहिजे.

**कुंदन**:—हां. तुम्ही सांगितलं तेव्हांपासून त्याचाच विचार करतोंय. आपली चर्चा झाली त्याच दिवसापासून माझ्या शंकाकुशंका पार नाहींशा झाल्या.

**शिवगौरी**:—(जरा मुरडून) शशीबेन, सर्वांच्या शंकाकुशंका काढून टाकायची अद्‌भूत शक्ति एक तुमच्याच ठायीं आहे.

**कुंदन**:—(उल्हासानें) त्यांच्याठायीं सम्राज्ञीचे सर्व गुण पूर्णपणें भरले आहेत. त्यांनीं आज्ञा केली, कीं ती मोडणं कुणालाच शक्य होत नाहीं. शशी-बेन, तुम्ही देवी आहात.

**शशि**:—तुमचे सद्गुण तुम्ही माझ्यासाठीं खर्च करतां, यावरून तुम्हीच अद्‌भूत नाहीं का !–येत्या आठवड्यांत माझा वाढदिवस आहे—म्हणून आम्ही

जुहूला जाणार आहोत. त्यावेळीं तुम्ही सर्वांनीं आलं पाहिजे. अर्धी रात्र तिथंच घालवूं.

**कुंदनः**—जरूर ! नि शिवगौरीबेनही येणार आहेत ना ?

**शिवगौरीः**—कुठं ? काय आहे ?

**शशिः**—येत्या सोमवारच्या पुढल्या सोमवारीं माझा वाढदिवस आहे. माझ्या काकांच्या जुहूवरील बंगल्यावर रात्रीं सारीं एकत्र जमणार आहों—तुम्हीं याल ना ? घरच्याच मंडळींना बोलावलं आहे.

**शिवगौरीः**—हो, येईन ना ! कां नाहीं ?—थोड्याच काळांत तुमच्या काकांनीं बराच पैसा केला.

**कुंदनः**—हं. वयाच्या वीस वर्षांपर्यंत ते गरीबच होते. त्यांच्या हातांत परीस आहे जणूं ! ज्याला हात लावतील त्याचं सोनं होतं.

**शशिः**—माझे वडीलही म्हणे फार हुशार होते.

**कुंदनः**—( खेदाने ) ते नव्हते मला माहीत !

**शशिः**—पण कुंदनलाल, आतां तुम्हांला माझे सॉलिसिटर म्हणून माझ्या मिळकतीचा हिशेब काकांकडून घ्यावा लागेल.

**कुंदनः**—( दचकून ) काकांकडून हिशेब ? [ हंसत ] हिशेब माझ्या ऑफिसांत आहे. सारं कांहीं ठीक आहे.

**शशिः**—काकांनीं माझ्यासाठीं नवं घर घेतलं ! माहीत आहे ?

**कुंदनः**—हां ! [ दचकून ] आं—कोण ? ही विधु आली ! (निस्तेज होतो )

( विधुमुखी निस्तेज पण उग्र चेहऱ्यानें यते )

**विधुः**—इथं आहांत का तुम्ही ? मला वाटलंच. भूताचा मुक्काम चिंचेच्या झाडावर !

**शिवगौरीः**—( मत्सरानें हंसून ) समजलं ना तुम्हांला ?

**शशिः**—या विधुबेन—बसा. माझ्या वाढदिवसाच्या गोष्टी करीत होतों आम्ही. तुम्ही याल ना ?

**विधुः**—( आपल्याच तंद्रींत ) माझं काय काम तिथं ? वकीलसाहेब

आहेत ना ! झालं तर ! मी असलें काय नि नसलें काय, दोन्ही सारखींच. [ कुंदनलाल तिच्याकडे डोळे वटारून पहातो. ]

**शिवगौरी:**—( विनोदानें ) छे, छे, असं कसं होईल. तुम्ही तर शशी-बनची मैत्रीण ! नि–

**विधु:**—नाहीं. शशीबेनचे मित्र हे आहेत. ( कुंदनलाल डोळ वटारतो )

**शशि:**—असं कां म्हणतां ? तुम्हीही आहांतच की ! नाहीं म्हणून चालायचं नाहीं.

**विधु:**—सतरा वेळां सांगतें–ना–हीं ! मी सांगसांगून थकलें–आज सहा महिने झाले, यांनीं कायद्याचा खर्डा अजून हातात घेतला नाहीं, नि शशीबेननीं सांगताच म्हणतात, आठ दिवसांत तयार करून देतों म्हणून !

**शिवगौरी:**—( हंसत ) पाहा, हे काकाच आले इकडे–आतां मांडा तुमची फिर्याद त्यांच्यापुढं. ( मनहर शेट येतो )

**शशि:**—( जरा शरमून ) नाहीं. नाहीं. काका ! यांच्या मार्फत तुम्ही घर घेतलं ना–त्याबद्दल बोलत होतें.–कांहीं दिवस तरी त्या घरांत मला एकटं करमणार नाहीं.

**मनहर:**—स्वातंत्र्य म्हणजे एकलेपणा. ( हंसून ) तिथं राहायला गेलीस म्हणजे मग माझ्यासारखा स्त्रीशत्रू तुला त्रास द्यायला यायचा नाहीं. काय विधु, कसं काय ? अशी घाबरलेली काय दिसतेस ? वकीलसाहेब रागावले वाटतं तुझ्यावर !

**शशि:**—सगळे तुमच्यासारखेच असतील नाहीं ?

**मनहर:**—हेटाळणी करणं चांगलं कीं रागावणं चांगलं ? तुला काय वाटतं विधु ? स्वतःच्या हक्काच्या माणसावर नाहीं रागावायचं तर काय परक्यावर ? काय ?

**विधु:**—पुरुष जें काय ठरवतील तें आम्ही स्त्रियांनीं चांगलंच म्हटलं पाहिजे ना !

**मनहर**—मनाला लावून घेशील तितकी जास्त दुःखी होशील !

**कुंदनः**—चला—शेट, जातों आतां आम्ही. चल विधु ! उशीर होईल. चल.

**विधुः**—( तंद्रींत ) हं. आतां उशीर होईल ! ( दोघं जाऊं लागतात ) बरं काका, येते हं.

**शशिः**—या हं विधुबेन ! ( दोघें जातात )

**शिवगौरीः**—भांडलींत वाटतं दोघं ?

**मनहरः**—हं. नवराबायकोनं नाहीं भांडायचं तर कुणी भाडायचं ?–कांहीं वेळ जमणार–कांहीं वेळां बिनसणार. फार भांडणं होणं हे गाढ प्रेमाचं लक्षण. हींच ना तीं तंटेभांडणं ?

**शशिः**—काका ! मग या शिवगौरीबेनचं भांडण मिटवून द्या ना !

**शिवगौरीः**—( रागानें पाहाते ) माझं भांडण ? माझं भांडणं कुणालाच नाहीं यायचं मिटवायला !

**शशिः**—माफ करा. कशाला अशा रडत बसलां आहांत ? काकांना सांगा ना !–ते करतील सारी मिटवामिटव !

**शिवगौरीः**—( मनहरलालकडे दीनवाणी पाहात ) कसली आली आहे माझी मिटवामिटव ? माझ्या दुःखांत मी चूर होऊन गेलेय. आला दिवस कसा तरी घालवतें आहें. कशाला उकरून काढतां या गोष्टी ?

**मनहरः**—शशी, मूर्ख आहेस तूं. ( हंसत ) ज्यांना वेगळं राहतां येणं शक्य आहे, त्यांनीं तसंच राहावं. तसं राहाण्यांतच त्यांना सुख मिळेल.

**शिवगौरीः**—काका ! तुम्ही शहाणे आहां-समंजस आहां !

**मनहरः**—मला शहाणा समजत नाहीं तुम्ही लोक, म्हणूनच दुःखं भोगतां आहां.

**शशिः**—I m asorrry, शिवगौरीबेन !

**शिवगौरीः**—( मनहरलालकडे पाहात ) तुम्हांला कसं कळणार ? अगदीं चिरडून गेलें आहें मी.—जळून गेलें आहें.—माझ्या संसाराची होळी झाली आहे !

**मनहर:**—( शिवगौरीकडे कुचेष्टेनें पाहात ) समजतंय मला !

**शिवगौरी:**—( हंसत ) तें तर केव्हांच समजलं मला—तुमच्यासारखं मला अजून कुणीच ओळखत नाहीं.

**मनहर:**—शशी, आतां काय तूं फिरायला जाणार आहेस ?

**शशि:**—[ कंटाळल्यासारखें शिवगौरीकडे पाहून ] हं. वेळ मिळाला तर जाईन.

**शिवगौरी:**—बरं—जातें आतां.

**मनहर:**—जातांच ?

**शशि:**—या—हं !

**शिवगौरी:**—हां. [ जाते ]

**शशि:**—काका, असं काय पाहातां आहां माझ्याकडे ?

**मनहर:**—( गंभीरपणें ) शशी, फार खराब काम करते आहेस ! तुझ्या-मुळं आज किती संसार मोडकळीला आले आहेत.

**शशि:**—( हंसत ) ते कसे काय ?

**मनहर:**—विचारतेस काय ? तुला दिसत नाहीं कीं समजत नाहीं ? तो कवि—वेडा झालाय—नि बिचाऱ्या त्या विधूचा संसार कोसळायला लागला आहे !

**शशि:**—मी का तिचा संसार कोसळतें आहें ?

**मनहर**—शशी, कौमार्यव्रताच्या ढोंगाखालीं आज कित्येक हृदयांशीं तूं खेळ खेळत आहेस. हृदयाशीं हृदय भिडवायचं नसलं तर दुसऱ्यांचीं हृदयं कां खेंचते आहेस ?

**शशि:**—मी काय कुणाला सांगायला गेलेंय ? सारे आपण होऊनच ना माझ्या भोंवती भिरभिरतात ?

**मनहर:**—शशि, तूं चंडिका आहेस. महिषासुरमर्दन करतांना पुरुष जातीचा सत्यानाश करते आहेस !

**शशि:**—रागवायचं नाहीं बरं काका ! चला—मला नवं घर दाखवा !

( पडदा )

## प्रवेश दुसरा

( **वेळः**—कांहीं दिवसानंतर एका रविवारी रात्रीं आठ वाजतां. विधुमुखी चिंताग्रस्ततेने बसल्या बसल्या एक चिठोरे वाचीत आहे. डोळे सुजलेले. )

**विधुः**— [ व्यग्रतेनें ] किति दिवस हें असं चालणार ? त्यांची मैत्री दिवसेंदिवस वाढतेंय नि माझा भोगही वाढत जातोय! काय करतील? मला सोडतील? घालवून देतील. ? मुलांचं कसं होईल ? [ डोळे पुसतें ] काय करूं ? कुठं जाऊं ? कुणाला सांगू ? दिवसेदिवस त्यांचं धंद्यातलं देखील लक्ष उडायला लागलंय—मी सांगतें तेंही एकत नाहींत. रात्रींची इतकी रडत असतें पण ढूंकून सुद्धां पहात नाहींत माझ्याकडे. [ सुस्कारा टाकून ] काय होतंय हे देवा ? [ टेबलावर पडलेली चिठ्ठी वाचते ] " प्रिय कुंदनलाल ! रात्रीं आठ वाजतां येतें. एकटेच रहा......" [ चिठ्ठी फेंकून देते ] दिवसांतून हजार वेळां भेटत असतील आणि आतां रात्रीं साडे आठ वाजतां भेटायचं शिल्लक राहिलं होतं ! या बेशरम पोरीला कसा कोणी आडवीत नाहीं ! असं वाटतं, कीं जीवच घ्यावा तिचा—काय करूं ?

**शिवगौरीः**—[ येऊन ] विधुबेन आहेत का ?

**विधुः**—[ चिठ्ठी लपवून डोळे पुसतें ] शिवगौरीबेन ? या. यावेळीं इकडे कुणीकडे ?

**शिवगौरीः**—याच रस्त्यानं जात होतें घरीं. मनांत आलं, म्हटलं, जातां जातां जावं विधुबेनना भेटून. काय ? तब्यत चांगली नाहीं कीं काय ?

**विधु** [ ओढून ताणून ] नाहीं. चांगली आहे. तुमचं कस काय ?

**शिवगौरी** :—[ हंसत ] मला कसली धाड भरली आहे ?—उद्यां तुम्हीं त्या तिच्या वाढदिवसाच्या समारंभाला जाणार आहांत का ?

**विधुः**—माझं जाणं निश्चित नाहीं.

**शिवगौरीः**—[ कळवळून ] काय करूं ? काकांना वाईट वाटेल म्हणून, नाहींतर त्या पोरटीचं तोंडसुद्धां पाहूं नये इतका राग येतो तिचा मला. आहे एवढी टीचभर पण दिमाख केवढा ? विधुबेन, वाईट वाटून घेऊं नका. पण

खरं सांगा, पुरुषांशीं कशी वागते ? अरे बापरे ! तिचा काकाही तिला कसा दम भरीत नाहीं ?

**विधुः**—वाऱ्यावर सोडलीय ! कोण सांगेल तिला !

**शिवगौरीः**—बहिणीसारख्या तुम्ही मला, म्हणून चार शब्द सांगणं हें माझं कर्तव्य समजतें. काल त्यांच्याकडे बसलें होतें मी-त्यावेळीं पाह्यलं-काय गोष्टी चालल्या होत्या कुंदनलालबरोबर ! माफ करा हं विधुबेन ! सख्याबहिणी प्रमाणं मानतें तुम्हाला म्हणून सांगतें-कां इतकं सहन करतां तुम्ही कुणाला ठाऊक ? मी काहीं सहन केलं नसतं.

**विधु**—दुसरं काय करणार बेन ? मला सारं काहीं समजतंय ( रडूं लागते ) पण काय करूं ? माझे हात अडल्येत.

**शिवगौरी**—( मिठ्ठासपणें ) हिंमत धरा विधुबेन ! ज्या दिवशी तुम्ही तिला माझ्याकडे आणलीत, त्याच दिवशीं तिला मी ओळखलं. अस काय दिसलं तिच्यांत म्हणून तिला तिकडे घेऊन आलांत ?

**विधु**—( रागानें रडत ) बेन, तिनं येतें म्हटलं, मग मला नको कसं म्हणतां येईल ? तिचं तोंड पाहाणं सुद्धां नको—पण काय करूं ?

**शिवगौरीः**—काय हंसते! काय बोलते! काय डोळे मुरडते! कुब्जाच जशी काहीं ! किती झालं तरी मी तुमची मैत्रीण-मला तें सहन होईना ! मी सासरीं कां जात नाहीं म्हणून ही मला विचारते ! जसं काहीं हीच मला पोसते ! अगदीं राग आला तिचा—वाटलं—जीभच उखडून टाकावी तिची ! मला सांगितलंन् तें सांगितलंन्-पण हें तुमच्या संसाराचं काय होऊन बसलंय ? जरा तुम्ही कुंदन-लालना चार शब्द सांगून तर पहा !

**विधुः**—( निराधारपणं ) काय सांगूं ?

**शिवगौरीः**—अहो, पण उघडया डोळ्यांनीं किती पाहाल ? तुमचं दुःख पाहून मला भडभडून येतं.

**विधुः**—काय करूं ? पुरुष का ऐकून घेणार ? विचार करकरून मी तर सुन्न होऊन गेलेंय शिवगौरीबेन ! सगळा संसार माझ्या हातून जातोय असं वाटतंय. सहन करण्याखेरीज मी दुसरं काय करणार ?

**शिवगौरीः**—( रागानें ) मी कांहीं सहन केलं नसतं. पुरुषांना तेवढं अंतःकरण असतं नि आम्हाला नसतं वाटतं ? आपण तर देणं नि घेणं एकाच वजनांत तोलतों !

**विधुः**—सामना द्यावा असं मलाही बरेच वेळां वाटतं. पण–बेन, हांसून खेळून नजरेसमोर राहणं भाग आहे. पुरुष वागतात तसं सारंच काय स्त्रियांना शोभणार आहे !

**शिवगौरीः**—विधुबेन, असं बोलणं तुम्हांला शोभतं का ? या सर्वांला एकच उपाय. ते एक बोलले तर आपण चार उत्तरं दिलीं पाहिजेत.

**विधुः**—त्या दिवशीं तुम्ही शठम् प्रति शाठ्यम् सांगितलं होतं, त्याची आठवण आहे मला. पण शिवगौरीबेन, बालपणापासून मी यांची पूजा–सेवा केली–( कानावर हात ठेवून ) नाहीं–नाहीं. तसं कसं होईल माझ्याहातून ! हातांतून गेले तर केवळ त्याच्या आठवणीवर जगेन, त्याचं घर नि मुलं सांभाळीन. ते बिघडले–म्हणून माझ्याहातून तसा अविचार कसा होईल ?

**शिवगौरीः**—तुमच्या अशा वागण्यानं तिला मोकळा रस्ता मात्र करून देतांहांत. तुम्ही कुंदनलालची सेवा करा–नि ते इतरांची सेवा करतील ! मला तरी कांहीं असलं सहन होणार नाहीं. मी तर लगेच रस्ता धरला असता ! विधुबेन, जितक्या गरीब व्हाल–तितकं लोक जास्त नाडतील.

**विधुः**—खरं आहे तुमचं म्हणणं बेन ! ( विचार करूं लागते )

**मोतीरामः**—( प्रवेश करून ) काय बेन, येणार आहेस कीं नाहीं ? तुझीं तीन मिनीटं–पण तीस झालीं मला. ड्यूटीवर जायचं आहे रात्रीं ?

**विधुः**—( उभी राहून ) या, मोतीरामभाई, बसा.

**मोतीरामः**—अरे कसा बसूं विधुबेन ? माझी जायची वेळ केव्हांच झालीय.

**शिवगौरीः**—चला येतें. ( उठते )

**विधुः**—( एकदम ) शिवगौरीबेन !—

**शिवगौरीः**—( लडीवाळपणें ) काय बेन ?

**विधुः**—अलखी रात्र मोतीरामभाई नोकरीवरच असतात का ?

**शिवगौरी:**—हो.

**विधु:**—( एकदम निश्चयानें ) एक काम कराल ? इथून कुणी विचारायला आलं, तर मी नाटकाला गेलें एवढं नाहीं का सांगणार ?

**शिवगौरी:**—कां ?

**विधु:**—एवढं करा ना. मोठी मेहेरबानी होईल.

**शिवगौरी:**—( हंसून ) बरं चल भाई.

**मोतीराम:**—विधुबेन, जातों.

**विधु**—या बरं भाई. ( शिवगौरी-मोतीराम जातात. ) हे भगवन् ! हे भगवन् ! शेवटीं माझी ही स्थिती ! काया-वाचा-मनें जी चळली नाहीं-तिची ही दशा ! अग ! तुझं काय नुकसान केलं मी ? कुठून पूर्वजन्मीची वैरीण होऊन उभी राहिलीस ? [ रडते ] असं करून सुद्धां यश न आलं-तर ? सत्यानाश होईल माझा ! पुरुष दुसऱ्या स्त्रीच्या मागं लागतो. पण स्वतःची स्त्री दुसरा पुरुष शोधतेय यांची कल्पनासुद्धां सहन होणार नाही त्याला ! नि तसं झालंच तर तिची गयसुद्धां करणार नाहीं. मग काय करावं ? स्त्री-स्वातंत्र्य ! देवा, देवा ! स्वातंत्र्य म्हणजे स्त्रीपुरुषांचे असले रंगढंग का ? नि त्याच्याबरोबरच माझ्यासारखीचं मरण ! ( रडते ) हाच मार्ग आत्ता--दुसरा नाहीं ! ( कुंदनलालचा आवाज ऐकू येतो ) आले कीं काय ? बरोबर कुणी आहे वाटतं ? तीच आली वाटतं ! ( ओठ चावून स्वस्थ बसते, कुंदनलाल नि शशिकला येतात. )

**कुंदन:**—विधु, शशीबेन आल्यायत.

**शशि:**—काय विधुबेन ?

**विधु:**—( न ऐकल्यासारखें करून ) अजून जेवलां नाहीं ?

**कुंदन:**—विधु, शशीबेन बोलावताहेत.

**विधु:**—जेवून आलांत कीं जेवायचे आहांत ?

**कुंदन:**—जेवलों.

**विधु:**—मीही जेवलें. ( रागांत निघून जाते. )

**शशि:**—विधुबेनची तब्यत ठीक नाहीं दिसत ?

कुंदनः—अलिकडे तिचं चित्त ठिकाणावर नसतं. बोला शशिबेन, काय सांगणार होतां ? बसा ना.

शशिः—( बसून ) कुंदनलाल, उद्यां सकाळीं आठ वाजतां काका माझी मिळकत माझ्या स्वाधीन करणार आहेत.

कुंदनः—होय. काकांनीं मला तशी चिठ्ठी पाठवली होती.

शशिः—त्यावद्दल माझं असं म्हणणं आहे, कीं तुमचे ते मोठे भागीदार गुलाबदास–त्यांना काकांचे सॉलिसिटर म्हणून बोलवा–नि तुम्ही माझे सॉलिसिटर म्हणून काम करा.

कुंदनः—असं केलच पाहिजे का ?

शशिः—( धीमेपणें ) हो. माझा सॉलिसिटर वेगळाच पाहिजे. तुमची हरकत आहे कांहीं ?

कुंदनः—[ हंसत ] माझी ! तुमचा सॉलिसीटर होण्याची हरकत ! I shall be delighted. पण याची जरूर काय ?

शशिः—कुंदनलाल ! मला संशय आला आहे.

कुंदन—कसला ?

शशिः—माझ्या वडीलांच्या धंद्यासंबंधीं मी ज्या ज्या वेळीं काकांकडे गोष्ट काढतें, त्या त्या वेळीं ते उडवून देत असतात–यासाठींच एका बैठकींत सगळ्या गोष्टी झाल्या पाहिजेत. काका अप्रमाणिक आहेत असं मी म्हणत नाहीं–पण माझ्या वडिलांचा किती हिस्सा होता, त्यांची मिळकत किती होती, या सगळ्या गोष्टी मला कळल्या पाहिजेत. वारस मुलगा या नात्यानं सगळा हिशेब मला मिळाला पाहिजे. आपल्याला भांडायचं नाहीं. पण हक्क तो हक्क !

कुंदनः—हां–हां. खरं आहे, परवां दिवशीं आपल्या चोपड्या पाहिल्या होत्या. आज सतरा वर्षं आमच्या पेढीच्या चोपडीमधें तुमचं खातं शंभर रुपये जमा करून मनहरशेटनी उघडलं नि त्यावेळेपासून वारंवार पैसे भरले जात आहेत.

शशिः—यावरूनच संशय येतो–हे पैसे आले कुठून ! त्यांचा पैसा मला

नको आहे. पण—पण माझ्या एका पैशाचाही हिशोब मी सोडणार नाहीं. त्यांच्याशीं व्यवहारानंच वागणार आहें. समजा, उद्यां मला धंदा करायचा असला—तर कळलं पाहिजे सारं !

**कुंदनः**—(प्रशंसेनें) खरं आहे—खरं आहे, You are wonderful ! शशिबेन ! तुम्ही मोठमोठ्या शहाण्या लोकांना देखील शिकवाल.

**शशिः**—निर्बलतेची पुतळी म्हटलेलं मला खपायचं नाहीं.

**कुंदनः**—मनहर शेट स्त्रीला सदोदित अबलाच समजतात.

**शशिः**—तीच त्यांना खोड आहे ! म्हणूनच—कुंदनलाल—उद्यां गुलाबदासना बोलावून घ्या. माझं काम तुम्ही करायचं नि माझा हिशेब तुम्ही घ्यायचा. होईल ना ?

**कुंदनः**—जरूर—जरूर—शशीबेन, तुम्ही सांगायची खोटी—सेवेला हजर !

**शशिः**—काकांवर विश्वास नाहीं—असं नाहीं—पण माझं हित मलाच पाहिलं पाहिजे.

**कुंदनः**—That's right You are wonderful !

**शशिः**—बरं—जातें तर. (उठून उभी राहाते.)

**कुंदनः**—उद्यां सकाळीं आठ वाजतां येतों. शशीबेन ! आतांच अभिनंदन करूं का ?

**शशीः**—नको. 'लगनना गीत लगनेज गवाय' Good night.

**कुंदनः**—Good night ! (शशिकला जातें) How wonderful ! नवीना—अस्सल नवीना ! (वर्तमानपत्र वाचूं लागतो. विधु रागांतच येऊन एका खुर्चीवर बसते)

**कुंदनः**—(वर्तमानपत्र भिरकावून) विधु, हीं तुझी रीत मला बिलकुल पसंत नाहीं.

**विधुः**—(चिडून) कुठली रीत ?

**कुंदनः**—आतां शशीबेन आल्या—त्यांची विचारपूस सुद्धां केली नाहींस ?

**विधुः**—(बेदरकारीनें) काय म्हणून करूं ? मी कांहीं बोलावलं नव्हतं त्यांना.

**कुंदन**—माझे जे जे मित्र येतील, त्यांची उठाबस तुला केली पाहिजे.

**विधुः**—माझे मित्र येतील त्यांची उठाबस करीन—वैऱ्यांची उठाठेव मला कशाला ?

**कुंदनः**—वैरी ? शशीबेननीं तुझं काय वाईट केलं ?

**विधुः**—( उभी राहाते. रागानें कापूं लागते ) काय वाईट केलं ? हें तुम्हीं विचारतां ? काय वाईट नाहीं केलं ? विचारा तुमच्या मनाला ! रोज घरीं आणीत होतां तिला—आतां तिच्याच घरीं जाऊं लागलां ! रोज फिरायला घेऊन जात होतां मला—आतां तिच्याबरोबर जाऊं लागलां ! तिचेच होऊन बसलां आहांत !—आतां काय राह्यलंय माझं ? इतके दिवस केलं सवरलेलं गेलं पाण्यांत. ( ओक्साबोक्शी रडूं लागते. )

**कुंदनः**—( रागांत ) वेडी झालीस, वेडी. इतकी शिकली सवरलेली तरी मूर्ख ती मूर्खच. शशीबेन सामान्य स्त्री का आहे ? ती तर देवी आहे !

**विधुः**—( मुसमुसत ) कुठून उत्पन्न होतात या देवी कोण जाणे ! परक्या पुरुषाला जाळ्यांत अडकावायला !

**कुंदनः**—शशीबेन जाळयांत अडकवते ? विधु, अशा बोलण्यानं तूं माझं मस्तक उठवते आहेस. तिच्यासाठीं मी वेगळा घर संसार मांडलाय का ? तिच्या स्नेहामुळं मला दिव्य दृष्टी प्राप्त झाली—मला नवं बळ आलं—मी होतों तसा राहिलों नाहीं—पण तुझ नि माझं—

**विधुः**—( मुसमुसत ) तुम्हीं होतां तसे राहिलां नाहींत हे मला कळतं. माझं तोंड पहाणं सुद्धां आवडत नाहीं तुम्हाला-नि माझं बोलणंही आवडत नाहीं.

**कुंदनः**—तूं माझी ऐहिक जीवनाची सहचरी—शशीबेन माझ्या दैवी—जीवनाची ज्योत !

**विधुः**—( डोळे पुसते ) आतां मीही काढतें शोधून एकादा शशीभाई—कुणीतरी माझ्या दैवी जीवनाचा दिवा ! मग पहा काय होतं तें !

**कुंदनः**—( रागानें ) विधु ! वेड्यासारखं कांहींतरी बरळते आहेस ! शशीबेनच्या पवित्र मूर्तीला उगीच कलंकीत करते आहेस.

विधुः—हो. कां नको ? माझा जीव जातो आहे त्याचं तुम्हांला कांहीं नाहीं नि त्या बाईसाहेबांची मूर्ति मात्र कलंकीत होते अं ? मेली एकदांची लग्न करती कीं पीडा तरी टळती !

कुंदनः—( उभा राहून ) खबरदार ! तिच्याबद्दल एक वाईट शब्द उच्चारशील तर ! वाटेल तें कर तूं !

विधुः—होय होय. वाटेल तेंच करणार मी आतां ! मीही दैवी जिवनाचा दिवा शोधून काढला आहे. मलाही पर्वा नाहीं तुमची. ( हुंदका देते. )

कुंदनः—हं आला का तुझा स्त्रीचा हक्क ?

विधुः—( ओठावर ओंठ दाबून ) हो हो तुम्ही दिव्य ज्योती धुंडीत रहाणार नि आम्हीं स्वस्थ बसायचं ? इतकीं वर्षे तुमची सेवा केली त्याचा हिशेब नाहीं ! जिथं आमचा हिशेब राहील तेंच ठिकाण शोधून काढूं आम्ही.

कुंदनः—( हंसत ) दम देतेंस ? जा वाटेल तें कर.

विधुः—( रडत ) बरं. बरं. तुम्हीं स्वतंत्र तर मीही स्वतंत्र. ! ( जाते )

कुंदनः—हद्द झाली या बायकोपुढं. स्वतः नि शशीबेन यांतला फरकच पहात नाहीं आंधळी ! एक पार्थीव दुसरी स्वर्गीय ! हिला कां मत्सर वाढतो तिचा ? कारण समजत नाहीं ! ज्या जीवनाचा आस्वाद शशीबेनच्या सहवासांत घेता येईल. त्याची हिला कल्पनासुद्धां नाहीं यायची !

( दुर्लभराम नि इंद्रजित येतात. )

दुर्लभः—अरे वकीलसाहेब आहेत का ? वकीलसाहेब ?

कुंदन—कोण दुर्लभराम ? या ना. कोण ? मास्तर ! कसं काय ?

इंद्रजितः—( दीनवाणें ) ठीक आहे.

दुर्लभः—काय–पुढं कांहीं ठरलेलं कळलं का ?

कुंदनः—हां. शिवगौरी जुहुला येणार आहे.

दुर्लभः—तुम्ही केव्हां जाल, तें तर सांगा.

कुंदनः—रात्रीं साडे आठ वाजतां आम्हीं शेटच्या बंगल्यावर जमूं. त्या

नंतर बारा एक वाजे पर्यंत तिथंच फिरत राहाणार आहोंत, त्यावेळीं तुम्हांला संधी सापडेल ! ( हंसत ) काय मास्तर, धीर होईल ना ?

**इंद्रजीतः**— ( धीमेपणानें ) हो.

**दुर्लभ**—अरे जरा होकार तरी जोरानं दे. उपाशी आहेस का!—याला वाटतं, याची बायको पळवून न्यायला मीच चाललों आहें.

**कुंदनः**—पुढें काय होईल तें मला कांहीं सांगतां येणार नाही.

**दुर्लभः**—अहो शेट, तुम्हीही गांवाला घाबरवणारेच दिसता. होउन होऊन काय होईल ? तुम्हां वकीलांची रीतच ही !

**कुंदनः**—किती मोटारी तयार ठेवणार आहांत ?

**दुर्लभः**—एका मोटारींत दोन पठाण नि इंद्रजीत—दुसऱ्या मोटारीत दूरवर मी नि वल्लभभाई, बसून राहूं. इंद्रजीतनं तिला पळवून आणली, कीं ताबडतोब वांद्याहून आगगाडींत ! मग जग झक मारो ! काय इंद्रजीत ?

**इंद्रजीतः**—खरं आहे.

**कुंदनः**—बरं, फत्ते करा ! मास्तर, हिंमत धरा—सर्व कांहीं ठीक होईल !

**इंद्रजीतः**—( बडबडत ) हां. हिंमत धरा—हिंमत धरा.

**दुर्लभः**—( शब्द चावीत ) हिंमत काय धरा. हिंमत धरा ! जरा रुबाबात बोल. चल—चल. कोण जाणे तुझा संसार कसा काय चालणार आहे ! साहेबजी.

( विधु बाहेर जाण्याचे कपडे पेहेरून येते )

**कुंदनः**—( चकीत होऊन ) विधु !

**विधुः**—( तोऱ्यानें ) काय ?

**कुंदनः**—( रागांत ) कुठं जातेस ?

**विधुः**—नाटकाला.

**कुंदनः**—( घाबरून ) कुठल्या ? कुणाबरोबर ?

**विधुः**—( मिजाशींत ) नक्की नाहीं ठरवलं !

( जाते. कुंदन स्तब्धपणे, दुर्लभराम कुचेष्टेनें नि मास्तर विस्मित होऊन राहं लागतात. )

**कुंदनः**—( भानावर येऊन ) बरं या—साहेबजी.

**दुर्लभः**—( हंसत ) वकीलसाहेब ! आम्हां म्हाताऱ्याचं जरा ऐका. कांहीं वर्षे घालवलींत आम्हीं !

**कुंदनः**—काय ?

**दुर्लभः**—तुम्ही शहाणे नि आम्ही मूर्ख ! काय सांगणार ? पण बाबा रे, पायांतली वहाण पायांयच ठेवली पाहिजे. चल, इंद्रजीत चल. ( दोघे जातात. )

**कुंदनः**—( स्वगत ) कुठं गेली ही ? ( दरवाजाबाहेर पाहून येतो. ) नाहीं दिसत ! ( खिडककिडे पाहातो ) कुठं गेली यावेळीं ? नाटकाला ? कुणा बरोबर ? एकटीच ? ( हातावर हात आपटून ) हद्द झाली या बायकोपुढं ! स्वतः स्वस्थ बसायची नाहीं नि दुसऱ्यालाही बसूं देत नाहीं ! बाईसाहेबांना वाईट वाटलं कीं चालल्या नाटकाला ! या आजकालच्या स्त्रिया कुणाला माहति कशा घडवल्या आहेत !—सरळपणें घरसंसार चालवतां येत नाहीं ! (अस्वस्थपणें इकडे तिकडे फिरतो. ) जरा कांहीं चुकलं कींवाईट वाटतं. अशानं संसार कसा चालणार ? आतां तर शशीबेनचा मत्सर वाटूं लागला आहे हिला ! केवढा मूर्खपणा ! कोण शशीबेनचा द्वेष करील ! दोघींचे मार्ग मुळांतच निराळे. यांची सरोबरी कशी होईल ? ( थोडावेळ इकडे तिकडे फिरतो. ) ही गेली तरी कुठं ! असं कसं चालेल ? मला विचारल्याशिवाय वाटेल तेव्हां जाते, ही काय रीत झाली ? हें काय घर आहे कीं कॉलेजचं बोर्डींग ? आतां अटकाव करावा लागेल. हे स्वातंत्र्य कीं स्वच्छंद ! पतीशीं प्रतारणा केली कीं सारं स्वातंत्र्य मिळालं का ! ( थोडावेळ फिरतो ) रामा ! रामा !

**रामाः**—( येऊन ) काय शेट ?

**कुंदनः**—बाई कुठं गेली ?

**रामाः**—मास्नी काय ठावां ! ( जातो )

**कुंदनः**—Oh the stupid woman ! वाटतं—मला त्रास देण्यासाठींच ढोंग करते आहे. अशी एकटी कुठंच जायची नाहीं. विधु किती सुशील ! असा अपरात्रीं परपुरुषाबरोबर कशी कुठं जाईल ? छे छे ! असं कधीं झालंय ? गाडीचा आवाज ? आली का ? ( खिडकींतून पाहातो ) गेली गाडी !

येईल आतां. मला वाटतं—मला फसवण्यासाठीं ढोंग करते सारं. ( वर्तमानपत्र वाचूं लागतो. थोड्या वेळानें फेकून देतो. दचकून वर पाहूं लागतो. ) आत्महत्या करायला तर गेली नाहीं ? आत्महत्या ! हां—मत्सरानं भारून गेलेली स्त्री काय नाहीं करणार ? काय करूं ? आजच तिचं पित्त खवळलं होतं. विधु—विधु—इतक्या वर्षांच्या अनुभवानंतर सुद्धां इतका अविश्वास माझ्याबद्दल ? हें काय आठवलं हिला ? ( टेलिफोन उचलून ) वर्दी देऊं का पोलीसस्टेशनवर ? पण नको. नाटकाला गेली असली तर उद्यां माझी फजिती व्हायची ! थिएटरवर कसा तपास करूं ? किती ठिकाणीं जाऊं ? विधु–विधु ! काय हें ? मोतीरामला वर्दी देऊं ? तो लगेच शोधून काढील. ( टेलिफोन करतो ) मोतीराम ! मोतीराम आहे ?...कोण शिवगौरीबेन...?हां मी कुंदनलाल. विधु आली आहे का तिकडे ? ......विधु आली होती ? कुठं गेली ?......मोती-रामबरोबर नाटकाला...?...मोतीरामबरोबर ? तुम्ही नाहीं गेलां ?............तीं दोघंच जायचीं होतीं ?......I see ! हां—माफ करा...नाटक कोणतं ?......माहीत नाहीं ? बरं......Thanks ( टेलिफोन ठेवतो ) मोतीरामबरोबर ! आतां समजलं—समजलं—अलिकडे ती तिकडे जाते नि मोतीरामही इकडे वारंवार येतो ! ( विचार करून ) किती चुकलों मी ! आज दहा वर्षे एके जागीं राहून मला संशय येतो विधूचा ? छेः छेः अशी कशी वागेल ती ! तिचा आत्मा शुद्ध आहे. त्या दिवशीं कुणी तिची थट्टा केली तर नुसती घाबरून गेली. केवढा उतावळा मी ! स्त्रीवर इत-काहि विश्वास असूं नये ? जरा वाचावं झालं. ( सोफावर निजून वाचूं लागतो ) शशीबेन देवता आहे.तिच्या नेत्रातलं तेज कसं चमकत असतं!(डोळे मिटूं लागतात. बाराचे ठोके ऐकून दचकून जागा होतो.) विधु ! विधु ! विधु नाटकाला गेली. मोतीरामबरोबर ? त्या गाढवावर कसा विश्वास ठेवला तिनं ? कुणी पाहिलं तर काय म्हणतील? ही अर्वाचीन स्त्री ! घरीं नवरा तडफडतो आहे नि ही स्वतः जातेय नाटकाला ! काय होणार आहे ?

( पुन्हां झोपतो नि दोन वाजतां जागा होतो. )

विधु ! विधु ! ( उठतो ) अजून आली नाहीं ? किती वाजले ? दोन. घड्याळ चालू आहे ना ? ( घड्याळ कानाला लावून ) नाटक संपलं असेल

आतां. कुठं गेली ? [ ओंठ चावून ] मोतीरामबरोबर पळून तर गेली नाहीं ? कुठं हिंडते आहे त्याच्याबरोबर ? विधु भटकते आहे ! विधु मला सोडून निघून गेली ? शशीबेनमुळं ? असं वागून समानता दाखवते आहे का ? मी वागतों तसं वागायला पाहाते का ? हरामखोर ! ( मोतीरामला फोन करतो. )

no reply ! काय झालं ? ( फोन ठेवतो ) माझी पत्नी–माझ्या मुलांची आई कुलटा ! विधु कुलटा ! येऊं दे तर खरी–ठार मारून टाकतों. अशा बायकोला घरांत ठेवून घेऊं ? खायला–प्यायला घातलं, शिक्षण दिलं. तें काय अखेर असा परिणाम भोगायला ? हेच का स्त्रीचे हक्क ?...Stupid woman ! असं वाटलं तुला, कीं शशीबेनच्या गोड सहवासात तुझे हे असले चाळे मी सहन करीन ? परपुरुषाच्या स्पर्शानं विटाळलेले तुझे हात मला किंवा माझ्या मुलांना लावूं देईन ? चांडाळ ! विधु ! अखेर तूं निमकहराम ठरलीस ? विधु निमकहराम ? कल्पना सुद्धां दुःसह वाटते !...तीन वाजायला आले ! नाहींशी झाली? आतां नाहीं यायची ? सती समजत होतों हिला. कुलटा ! सत्यानाश केला माझ्या संसाराचा ! ( मान खालीं टेकून पडतो. थोड्या वेळानें बेल वाजते. ) आली ! उघडूं ? ( दार उघडतो. विधु तोऱ्यानं येऊन आंत जाऊं लागते. )

**कुंदनः**—[ दरडावून ] विधु !

**विधुः**—काय ?

**कुंदनः**—( चिडून ) कुठं गेली होतीस ?

**विधुः**—नाटकाला.

**कुंदनः**—आतां तीन वाजले.

**विधुः**—वाटेल तिकडे गेलें होतें. तुमचं काय गेलं ?

**कुंदनः**—माझं काय गेलं ?–काय गेलं ? कमजात !

**विधुः**—तुम्हीं माझ्या देहाचे मालक आहांत !—

**कुंदनः**—( चिरडीस येऊन ) बोल–कुणाबरोबर गेली होतीस ?

**विधुः**—माझ्या दिव्य जीवनाच्या ज्योतीबरोबर ! ( तोऱ्यानें निघून जाते. )

**कुंदनः**—( पाठीमागून धांवत जातो. विधु दार बंद करते ) माझं जीवन भ्रष्ट केलं! माझा संसार भ्रष्ट केला! हाय भगवन! ( सोफावर पडतो )

( पडदा पडतो )

## प्रवेश तिसरा

( वेळ—दुसरे दिवशीं म्हणजे शशीकलेच्या वाढादिवसादिवशीं सकाळीं साडे सात वाजतां. मनहरलालच्या बंगल्याचा व्हरांडा. गौरीशंकर पायावर पाय चढवून बसला आहे. समोरच्या समुद्राकडे पाहून हंसत बडबडत आहे. )

**गौरीशंकरः**—( स्वगत ) देवांगनांच्या दिव्य तेजाची ती अधिष्ठात्री ( डोळे मिटून ) तिच्या हालचालीवर ब्रह्मांड डोलतं आहे...नि प्राण रसब्रम्हांत आंदुळताहेत! तिचा वाढादिवस! जिकडे तिकडे वसंत ऋतुचा आल्हाद! तिचा वाढादिवस! ( डोळे मिटून हंसतो )

**शशीः**—( धांवत धांवत येऊन ) कसं काय गौरीशंकर? Good morning!

**गौरीशंकरः**—( हंसत उठतो. ) शशीबेन! अभिनंदन करतों. मीच पहिला ना?

**शशीः**—( हंसत ) नाहीं. पहिली मीच आहें. आज मी उठतांच आरशांत पाहून माझं स्वतःचं अभिनंदन केलं. नंतर तुम्ही! बसा.

**गौरीशंकरः**—नको. मला ट्यूशनला जायचं आहे. उद्यांपासून तुमच्या बंगल्यांतच चहाला येईन. या घरांत माझा आत्मा पार्थिव शृंखलेंत अडकून पडला जातो. ( पाहात राहातो ) सुभगे, तूं राज्ञी प्रमाणं सत्ताशलि नि देवते-प्रमाणं प्रेरणावाही आहेस.

**शशिः**—तुम्ही आज प्रशंसेच्या धुंदींत आहांत वाटतं?

**गौरीशंकरः**—प्रशंसा शब्द क्षुद्र वाटतो!' विश्वमा व्यापी आज वसंता'-प्रमाणं वाटतंय्! बरं, जातों आतां!

**शशिः**—Thank you! रात्रीं या.

**गौरीशंकरः**—परस्परच येतों. मोटारीपेक्षां चांदण्यांत विहार केला तर मीलनाची उत्सुकता वाढते.

**शशिः**—गौरीशंकर, तुम्ही आज फारच काव्यमय बनला आहांत. या हं. ( गौरीशंकर जातो ) बिचारा किती पूज्य भावानं वागतो. गुजराती तरुणांमधें निर्मळ स्त्रीभक्ति वाढते आहे, हेंच गुजरातचं मोठं भाग्य ! आज केवढी सुखी मी ! ( आरशांत पाहून वेणी नीट करते ) सर्वांगीण जीवन किती चांगलं ! पैसा, रूप, कला, मैत्रि, सत्ता ! आज ती भयंकर शिवगौरी आढळली तर तिलाही भेटेन. उद्यां सकाळ उजाडली कीं स्वतंत्र ! माझी मालक मीच. Lovely !

**मनहरः**—( येऊन ) काय शशी, एकटीच काय बोलते आहेस ? अभिनंदन करतों. ( जवळ येउन गंभीरपणें शशीच्या खांद्यावर हात ठेवतो. ) शशी ! ईश्वर तुझं कल्याण करो.

**शशिः**—काका ! आज इतके गंभीर कां ?

**मनहरः**—शशी ! आज तू स्वतंत्र झालीस नि मी एकटा झालों. तुझा फायदा झाला—पण माझं नुकसान झालं.

**शशिः**—काका ! असं कां म्हणतां ? मी मोठी झालें त्यांत तुमचं काय गेलं ? रोज आपण भेटूं—बोलूं. !

**मनहरः**—भेटणं—बोलणं वेगळं नि एका घरांत एकमेकांच्या सहवासांत रहाणं वेगळं ! मला वाटतं, बरीच वर्षे झालीं, विलायतेला जायला मिळालं नाहीं. आतां म्हणतों जाऊन यावं.

**शशिः**—काका, असं का बोलतां ? आतांच तर मला तुमची जरूरी आहे. तुम्हींच माझे मार्गदर्शक ना ?

**मनहरः**—आजकालच्या स्वतंत्र स्त्रीला मार्ग दाखवायला कोण हवा असतो शशी ! तुझा पालक या नात्यानं आज मी तुझ्यावर शेवटची सत्ता गाजवून घेणार आहें. ( ममतेने ) माझं एक ऐकशील ?

**शशिः**—असें गंभीर कां होतां ?

**मनहरः**—शशी ! आज गंभीर होण्याचाच प्रसंग आहे. उद्यांपासून आपण स्वतंत्र नि समान स्त्री—पुरुष या नात्यानंच भेटूं. माझा एक उपदेश ध्यानांत ठेव—

**शशिः**—( हसंत मनहरच्या खांद्यावर हात ठेवीत ) काय तें सांगा ना—

**मनहरः**—( खांद्यावरचा हात दूर सारून ) तूं एक अद्वितीय स्त्री व्हावीस या उद्देशानं मी तुझं पालनपोषण केलं——

**शशीः**—(हंसत) अद्वितीय स्त्री मी नाहीं झालें ?

**मनहरः**—( कळवळून ) नाहीं. शशी, तुझा आत्मा नायकीण होऊं पहातो आहे !

**शशिः**—( जरा रागानें ) म्हणजे ?

**मनहरः**—रागावूं नकोस. अद्वितीय स्त्री हृदयाची अधिष्टात्री असते. दुसऱ्याच्या नि स्वतःच्या हृदयाच पोषण करते–उद्धार करते–नि तूं स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या हृदयाची पर्वाच करीत नाहींस ! पूर्वी एकदां तुला सांगितलं होतं, कीं तूं अत्यंत भयंकर खेळ खेळते आहेस—हृदयाचा खेळ ! हा खेळ नायाकिणी पैशासाठीं खेळतात—तूं खेळते आहेस तुझा अभिमान राखण्यासाठीं ! म्हणूनच म्हणतों–तुझा आत्मा नायाकिणीचा होतो आहे.

**शशिः**—माझा आत्मा गुलाम बनला तर तुम्हांला आनंद होईल, हें मला समजतं !

**मनहरः**—मुळींच नाहीं. गुलाम नि नायकीण यांच्यामधें फार फरक आहे. स्त्री सती होऊं शकते–सम्राज्ञी होऊं शकते–सखी होऊं शकते नि देवताही होऊं शकते.

**शशिः**—काय म्हणून माझा आत्मा सम्राज्ञीचा नाहीं ? देवीचा नाहीं?–सगळेच कांहीं तुमच्या मताचे नाहींत !

**मनहरः**—इतरांत नि माझ्यांत फार फरक आहे. कांचेच्या कपाटांत साखरेचा हत्ती पाहून माझी जीभ हुळहुळत नाहीं. तुला ऐकायचं असलं तर ऐक–ही खरीखुरी परिस्थिती स्पष्टपणें समजावून देणारा–आठ लाखांच्या मालकिणीला समजावून देणारा कुणी भेटणार नाहीं. सतीचा आत्मा असता तर तूं भक्तिभावाच्या बलावर पुरुषांना वश करून घेतलं असतंस ! सखीचा असता

तर सहयोगाच्या बलावर पुरुषाला वश केलं असतंस! देवीचा असता तर भावनाप्रधान प्रेरणेनं वश केलं असतंस—पण शशी! माझ्या शशी! पुरुषाची भक्ति करण्याची त्यागी वृत्ती तुझ्या ठायीं नाहीं. त्याला आज्ञा करण्याची शक्ति नाहीं. त्याची सहचरी होण्याची खंत नाहीं. त्याला प्रेरणा करण्याची विशुद्ध नि अपार्थिव भावनामयता नाहीं. थोड्याशा बुद्धिसामर्थ्यामुळं, थोड्याशा वस्त्रालंकारामुळं, काहींशा वक्तृत्वामुळं, नेत्राच्या हालचालीवर, हास्याच्या तालावर नि तारुण्यांत पदार्पण करणाऱ्या तुझ्या कामनीय मोहिनीमुळं तूं सर्वांना वेड लावलं आहेस आपलं. या प्रभावाच्या तोऱ्यांत अंध बनून तूं स्वतःलाच देवता मानूं लागली आहेस नि इतरांची निर्दोष अंतःकरणं जाळून टाकते आहेस!

**शशि**:—(ओठ चावून राग दाबते) काका! काका! तुम्हीच असं बोलायला लागलांत तर मी काय करूं? कुणी दुसऱ्यानं म्हटलं असतं तर—

**मनहर**:—(खेदानें) मला समजतं. उद्यांपासून मला असं कांहीं बोलायचा धीर होणार नाहीं म्हणून आज बोलून घेतों आहें. आजच्या दिवसापर्यंत मी तुझा पालक—नव्हे एक रीतीनं मालक होतों—म्हणूनच कुणीं तुझी खरी किंमत पारखण्याची हिंमत करायला धजले नाहींत, याची आठवण ठेव. उद्यां तूं स्वतंत्र होशील—मग पहा अनुभव!—अविवाहित तरुणी पुरुषांना पहावत नाहीं—

**शशि**:—तुम्हांला असंच वाटायचं! जसे कांहीं सगळेजण माझ्याशीं लग्न करायला हातीं माळ घेऊन बसले आहेत. असंच असतं. तर विलायतेंतल्या तरुण मुली जिवंत कशा राहिल्या असत्या?

**मनहर**:—शशि! हिंदुस्थान म्हणजे विलायत नव्हे. तिकडे पुरुषाच्या नसानसांत स्त्रीविषयीं जो आदरभाव आहे तो आपल्या इकडे नाहीं. तिथल्या मुलींच्या अंगची आत्मसंरक्षणवृत्ति परंपरागत संस्कारामुळं वाढतेच आहे. त्या वाटेल त्याच्याबरोबर हिंडतात, फिरतात, मजा मारतात—पण ज्याच्याशीं लग्न करायचं नाहीं, त्याच्यापासून शक्य तों दूर कसं राहायचं, हें त्यांना—चांगलं माहित असतं.

**शशिः**—ही संरक्षणवृत्ति परमेश्वरानं आम्हांला दिली नाहीं का ?

**मनहरः**—ही संरक्षणवृत्ति अजून तुला शिकायची आहे—पण तुझ्या अशा या नाचऱ्या वागणुकींमुळं तुला ती शिकतां येणार नाहीं. तें तुला आज नाहीं समजायच! कांहीं दिवसांनीं माझ्या शब्दाची तुला आठवण होईल. ज्यांच्या हृदयांत तूं आज आग पेटवून दिली आहेस, त्या आगीच्या झळीपासून तुझं स्वातंत्र्य, तुझं शिक्षण, तुझा पैसा—कुणीही तुला बचावूं शकणार नाहीं. आज जे तुला सन्मानानं पुजताहेत तेच उद्यां तुला नायकीण म्हणून तुच्छतापूर्वक धिक्कारतील !

**शशिः**—आणखी कांहीं ?—

**मनहरः**—शशि, या सगळ्या गोष्टी तुला ऐकवणं मला भाग पडलं, या बद्दल फार वाईट वाटतं. कुणावर परिणाम करायचा तर बुद्धीच्या बळानं—भावनेच्या बळानं कर!—नायकीपणानं नव्हे ! बाई बनायचं तर बाईच रहा—दुसऱ्यावर छाप टाकण्याचा प्रयत्न करूं नकोस !

**शशिः**—हे पहा गुलाबदास नि कुंदनलाल आले.

( पाय ओढून चालत गुलाबदास नि तारवटलेल्या चेहेऱ्यानें कुंदनलाल येतात. )

**मनहरः**—ओ हो हो ! गुलाबदास ! इकडे कुणीकडे ? या कुंदनलाल.

**गुलाबदासः**—( पान खात ) मनहरलाल, आज किकीचा वाढदिवस ना? कुंदनलालना आमंत्रण दिलं होतं ?

**शशिः**—मीच सांगितलं त्यांना बोलवायला. कुंदनलालना माझ्या तर्फे बोलावलं नि गुलाबदास तुमचे सॉलिसिटर म्हणून बोलावले.

**मनहरः**—कशासाठीं ? माझ्यातर्फे कुणा सॉलिसिटरची जरूरच नाहीं. बसा.

**कुंदनः**—[ शशीला ] शशीबेन ! माझीं हजार अभिनंदनं ! ही माझी भेट. [ पेटी देतो ]

**शशिः**—Thank you so much.

**मनहरः**—( बेलवर हात ठेवून ) चहा घ्याल ?

**गुलाबः**--राहूं दे. चहा पिऊन पिऊन पोट नकामी झाल आहे, बोला, आता काय करायचं आहे ? [ डबी उघडून तपकीर ओढूं लागतो. ]

**मनहरः**—काय करायचं आहे ? ज्या दिवसांपासून मी मिळवूं लागलों आहें त्या दिवसापासूनचा शशीचा सगळा हिशेब तुमच्या पेढीवरच आहे. हें घर मी घेतलं—त्याचा दस्तऐवज शशीच्या नांवे आहे, तोही तुमच्याकडे आहे. हें घर माझी आजची भेट ! झालं ?

**शशिः**— काका, माफ करा, पण सारे व्यवहार अगदीं व्यवहारी धोरणानं झाले पाहिजेत.

**मनहरः**— ) व्यवहारी धोरणानं ?--( रडवं हंसून ) हं ! सारं कांहीं व्यवहारी धोरणावरच आहे—पण तें गुलाबदासच्या तिथं !

**शशिः**—माझे वडील वारले—त्यावेळीं त्यानीं काय मिळकत शिल्लक टाकली होती ?

**मनहरः**—( ओंठ दाबून ) तुझा बाप ? मुली, तुझ्या बापाचीच मिळकत दिसते आहे, आज आहे ती !

**कुंदनः**—पण ते तुमचे भागीदार होते ना ? तेंच तर शशिबेनना कळायला हवं आहे.

**मनहरः**—( शशीकडें म्लानपणें पहात ) होय. भागीदार होते खरे, पण त्यावेळीं आमच्याकडे काय होतं ? ( डोळे मिटून ) मी मुंबईला आलों तेव्हां धोतरजोडे खांद्यावर टाकून फेरी करीत होतों.

**शशिः**—मग माझ्या खातीं वारंवार पैसे जमा होत, ते माझ्या वडिलांच्या पैशांतलेच ना ?

**मनहरः**—( अस्वस्थपणा दाबण्याचा प्रयत्न करतो. इकडे तिकडे फिरून ) होय !

**कुंदनः**—मग त्याचा हिशेब ?

**मनहरः**—हं—त्याचा हिशेब !—खरं आहे—संध्याकाळीं गुलाबदासकडे पाठवून देतों. ( उभा राहतो ) बरं—मला आतां जायचं आहे.

**शशिः**—काका, कां जातां? ( जवळ जाऊन ) वाईट वाटलं ?

**मनहरः**—( तिच्या डोळ्यांत पाहात राहातो ) वाईट ?–तुझ्या बोलण्यानं मला कधीं वाईट वाटेल का ? तसं वाटलं असतं, तर एवढी मोठी झाली असतीस का ? चला–साहेबजी ! गुलाबदास, आज दुपारी ऑफिसमधें या.(जातो)

**शशिः**—[ चिंतातुरपणें ] काकांना वाईट वाटलं !

**कुंदनः**—होय. व्यवहारीपणाचा हा तुमचा पहिला अनुभव.

**गुलाबः**—( उभा राहून चंचीमधून पान काढून खातो ) एवढ्यासाठींच मला इथं बोलावलं ? Very bad ! Extremely bad ! [ जातो ]

**कुंदनः**—घाबरूं नका, हें business आहे. असंच चालायचं.

**शशिः**—I am so sorry. चला, झालं तें झालं. बिचाऱ्यानीं इतके दिवस माझं पालनपोषण केलं नि आजच मला हें काय सुचलं ?

**कुंदनः**—सर्वांनाच हिशेब द्यायला नको असतो !

**शशिः**—त्यांनीं तसं बोलायला नको होतं. हक्क तो हक्क नि मेहेरबानी ती मेहेरबानी ! चला–कुंदनलाल, आज विधुबेनना घेऊन या हं. पहा–विसरूं नका

**कुंदनः**—( रडवें हंसून ) जरूर ! [ जातो ]

( पडदा पडतो. )

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

वेळः—रात्रीं नऊ वाजतां, चांदणें पडलें आहे.

[ **स्थळः**—समुद्र आणि मनहरलालच्या बंगल्यामधील रेतीमय किनारा. एकीकडे समुद्राच्या मंद मंद लाटा नि दुसरीकडे दिव्याच्या लखलखाटांत शोभणाऱ्या बंगल्यात शशिकला सुस्वर गात आहे–

' प्रीत पुरवनी हुं शुं करूं मेवाडा राणा '

गौरीशंकर नुसतें धोतर नि सदरा पेहेरून किनाऱ्यावर धीमे धीमे येतो. ]

**गौरीशंकरः**—( स्वगत ) अशी चांदणी ज्या जगाला शोभवते आहे तिथं विजेच्या दिव्याखालीं लोक कसे बसूं शकतात ?–नि त्यांतही कुणी तिच्या शेजारीं बसला म्हणजे माझा जीव कसा घाबरा होतो. चांदणी–ती–नि मी–मी नि चांदणी–नि फार झालं तर सागर !( गाऊं लागतो. )

" आत्मा ना उल्लास तारे उर रमेजो
वहाली आवजे ते दिन मारी पासे जो, "

हें चांगलं जमलं. ( हंसतो ) हं, आतां स्फूर्ति येऊं लागली !

" पण स्थूळ कैं विलासे लोभे मन जो
वहाली न आवजे ते दिन मारी पास जो "

एक मात्रा वाढली वाटतं ! आतां सगळंच वाढेल.

" पण भावनानी धुन लागे मनजो
वहाली आवजे ते दिन मारी पासजो "

जिथं पाहातो तिथं उघड दिसतं आहे–तिचा आत्मा नि माझा भूतकाल, हे एकमेकांचे सायीदार झालेच पाहिजेत. तेच विचार, तीच ऊर्मि ! हिचा सहवास मिळण्यासाठीं आम्हांला किती जन्मांची तपश्चर्या करावी लागली असेल ? खरोखर माझा एकट्याचा नव्हे–तिचा नव्हे पण कित्येकांचा उद्धार होईल आमच्या

संबंधामुळं ! माझी बुद्धि नि तिची-माझी रसिकता नि तिची–माझी काव्यमयता नि तिची वाक्चातुरी,–तिची सूक्ष्म दृष्टि नि माझं विशाल दर्शन, तिची छटा नि माझी बुद्धी, तिची प्रेरणाशक्ति नि माझी–माझा–माझं-नि तिचं धन नि माझी विलासाकांक्षा नि आम्हां दोघाचं विशुद्ध प्रेम–( गळा खांकरून गाऊं लागतो. )

" पण भावनानीं धुन लागे मन जो
वहाली आवाजे ते दिन मारी पासजो "

कोण येतं आहे ? शशी !—किती सुंदर नांव ! उंः–ही तर विधु ! रडवी ! एकींत नि दुसरींत केवढा फरक ? हिला पाहिलं कीं शोकगीतं रचण्याची स्फूर्ति होते नि डोळे अश्रूंनीं भरून येतात ! ( जातो )

**विधु**—( येते) हे प्रभू ! दीनानाथ ! आतां नाहीं माझ्याच्यानं हें पाहावत ! ( डोळ्यांवर हात ठेवून ) मी चांडाळणीनं असं काय पाप केलं, कीं ही बया हंसतां खिदळतांना मी हंसत मुखानं पाहाण्याची शिक्षा या जन्मी मला भोगावी लागावी ? बोलायची किं रडायची सुद्धां चोरी !

**मोतीरामः**—( येऊन ) कोण विधुबेन ?

**विधुः**—( दचकून ) कोण तुम्ही ? मोतीभाई !

**मोतीरामः**—होय–काय आहे?–काय झालं ?

**विधु**—ठीक, काय व्हायचं राहिलं आहे बाकी ?

**मोतीरामः**—पण ते बोलले का कांहीं ?

**विधुः**—तुमच्याकडून निघालें ती दीड तास तर माझ्या दरवाज्याबाहेर एकटी उभी होतें. मला काय वाटलं तें माझं मला माहीत—

**मोतीराम**—नंतर ?–

**विधुः**—( सुस्कारा टाकून ) नंतर काय ? मी घरांत शिरतांच हे वसकन् आंगावर आले. मीं दार बंद केलं नि रडूं लागलें—नि हे दिवाणखान्यांत खुशाल झोपीं गेले ! सकाळ होतांच फिरून गेले त्या बयेकडे–नि आतां तर तुम्ही पाहात आहांच ? होतं त्याहीपेक्षां जास्तच !

**मोतीरामः**—आतां काय करणार ?

**विधु:**—ही मेली मरतही नाहीं ! काय करायचं ? रडरडून मरायचं ? हिंदू स्त्री दुसरं काय करणार ? रडायचं मगळसूत्र बांधूनच ना आमचा संसार थाटतो ?

**मोतीराम:**—( जवळ येऊन ) रडूं नका. असा धीर सोडून कसं चालेल ?

**कुंदन:**—( पाठीमागच्या बाजूने येतो. स्वगत ) अजून दोघं तीं दोघंच! आता मला कुणाची आडकाठी राहिली नाहीं.

**विधु:**—कसा धीर सोडूं नको ? कशी हिंमत राहील ?

**कुंदन**—हो–कशी हिंमत होईल ? आतांपर्यंत मला वाटत होतं, कीं ही सुरळीत वागेल नि मी शशीबेनला विसरून जाईन–पण आतां—

**मोतीराम:**—गरीबांचा वाली परमेश्वर।

**कुंदन:**—हां–हां, परमेश्वर तुझ्या हांकेला येतोय धांवून ! भोग दुष्ट आपल्या कर्माचीं फळं ! माझं कर्तव्य संपल–आतां माझा मार्ग मला मोकळा झाला. ( जातो )

**विधु:**—कांहींच मार्ग सुचत नाहीं. ( जाऊं लागते )

**मोतीराम:**—आपोआपच सुचेल मार्ग. ( दोघेंही बोलत जातात )

**शशि:**—( गुणगुणत येते )

कंठी माळा बेवडी मारे शियळव्रता शणगाररे।
केम करी विसरूं नाथ मारो भवभवनो भरथाररे—

आज हीं सगळीचं कां अशीं विस्कळीत वागताहेत ? ते गुलाबदास–माझ्याकडे वटारलेल्या डोळ्यांनीं सारखे पाहात आहेत–कुंदनलाल नि विधु दुर्मुखलेले दिसताहेत. गौरीशंकर नि शिवगौरी अस्वस्थ दिसताहेत. आजची अख्खी पार्टीच बिघडून गेलयि. मला वाटतं, सगळ्यांनांच एकेकटं फिरूं द्यावं !...नि बिचारे काका ! ते तर अगदींच मलूल झाले आहेत !...... आज सकाळीं किती खराब वागलें मी ! किती मायाळू स्वभाव त्यांचा ! नि अशा आनंदाच्या प्रसंगीं मी मेलीनं कशाला पैशाची गोष्ट काढावी ? त्यांना फार लागलं तें!...पण माझं कुठं चुकलं ? त्यांनीं मला शिकवलं, वाढवलं नि त्यांनींच असं म्हणावं ! माझा आत्मा नायाकिणीचा ! म्हणजे काय ? स्त्रीनं

स्वातंत्र्य भोगूंच नये ! मी स्वतंत्र झालेली पाहावत नाहीं त्यांना. खरं आहे तें. पुरुष सदोदीत स्वतःला रखवालदार समजत असतात. जसं कांहीं गांवाची व्यवस्था ठेवणं यांच्याच हातीं आहे ! इतके चांगले काका, एवढं समजत नाहींत, कीं स्त्रीला गुलामाप्रमाणं राबवण्याचे दिवस गेले! ठीक आहे. मी माझ्या आचरणानं काकांना दाखवून देईन,–मी स्वतंत्र आहें पण स्वच्छंदी नव्हे–माझा आत्मा सम्राज्ञी–सखी–देवतेचा आहे–दासीचा नव्हे–किं–नायकीणिचा नव्हे ! आं ! हे काकाच आले इकडे ! काका–काका—

**मनहरः**—( गंभीर नि स्थिर नजरेनें पाहात ) काय शशी ?

**शशिः**—( जवळ जाऊन ) काका ! सकाळीं मी फार नादानपणा केला ! हं ! माफ करा–चालकाला.

**मनहरः**—( गंभिरपणें ) नाहीं. शशी !, तूं बालक नाहींस. मी आतां म्हातारा होत चाललों. तुझी समजूत पाडणं माझ्या शक्तिबाहेरचं आहे. तुझा भार वाहायला तूं समर्थ झाली आहेस किं नाहीं एवढंच मला पाह्यचं आहे.

**शशिः**—काका ! असं कां वाईट वाटून घेतां ? तुमच्या मदतीशिवाय माझं काय चालणार आहे ?

**मनहरः**—शशी, तुला माझ्या आधीन ठेवायची असती तर शिक्षण कां दिलं असतं ? तुझे पैसे स्वतंत्र ठेवून तुला स्वतंत्र राहाण्याची व्यवस्था कशाला केली असती ? मी अगदीं जुन्या विचारसरणीचा आहें–पण तुला अगदीं संपूर्ण स्वातंत्र्य दिलं ! ( खिन्नपणें ) आपण दोघेंही एकमेकांपासून स्वतंत्र राहून—स्वतंत्र राहून—राहून–काकापुतणीचं नातं राखूं. एवढं झालं म्हणजे ठीक.

**शशिः**—असं खिन्न बोलूं लागलां म्हणजे मला अतिशय वाईट वाटतं काका ! तुमचे अगणित उपकार झाले आहेत माझ्यावर, हें मी कसं विसरेन !

**मनहरः**—शशी, उपकाराच्या ओझ्याखालीं चिरडून गेलेल्या भावनांत विष भिनायला फारसा अवधि नको. मी तुझं पालन पोषण केलं हें विसरून जा. मी तुझा पैसा सांचवला हेंही विसरून जा. माझ्याबद्दल तुला आदर वाटला पाहिजे–कृतज्ञता वाटायला नको आहे.

**शशिः**—काका, जितका मान मी तुम्हांला देतें तितका देतें का कुणाला ?

**मनहरः**—पण शशी, आजपासून तुझा नि माझा मार्ग वेगळा झाला आहे. अशावेळीं थोडं सुद्धां मन दुखवणं मला सहन होत नाहीं.

**शशिः**—नाहीं, काका, असं कांहींच घडलं नाहीं.

**मनहरः**—घडलं आहे. शशी, गुलाबदासकडे मी एक पाकीट दिलं आहे, तें आज त्यांच्याकडून घे–नि रात्रीं तुझ्या नव्या घरांत तूं राहायला जाशील त्यावेळीं वाच.

**शशिः**—त्यांत काय लिहिलं आहे ? आतांच आणतें मागून ?

**मनहरः**—नको. मग—

**शशिः**—नाहीं–नाहीं. मी आतांच आणतें. उभे रहा हं–( धांवत जाते )

**मनहरः**—( सुस्कारा टाकून ) जीवनभरच्या आशा आज निष्फल ठरल्या. माझे सारे प्रयत्न आज धुऊन गेले ! उद्यांपासून आमचे मार्ग वेगवेगळे !

स्मृतिकारानं बालविवाहाच्या करंडींत स्त्रीला दडपून ठेवलं होतं. पाश्चात्य संस्कारामुळं त्या करंडीवरचं झांकण उचललं गेलं आहे, नि कित्येक युगं कोंड-लेली ही स्त्रीरुपी नागीण आतां फणा वर करून फोंफावते आहे. केवळ एका मोहोरीमुळें ही वश होईल हें कोण जाणतं आहे ! मला वाटत होतं–मी चूक करतों आहें म्हणून !

पश्चिमेकडच्या वाऱ्यानं कित्येकांची आशासृष्टि उधळूं लागली मग माझीच कां जाग्यावर राहिल ? खरं आहे ! आपण कुठं आहोंत तें समजत नाहीं. मुलीचं बालपणींच लग्न केलं म्हणजे ती सृष्टीच्या छपराखालीं राहाते–पण टिकते तर खरी ! तीच मोठी झाली–शिकली–समानता नि स्वातंत्र्याचं वारं आंगामधें शिरलं–म्हणजे केव्हां भिंत कोसळेल–केव्हां वासे मोडून पडतील किं सबंध छप्परच उडून जाईल. हें कुणाला सांगवेल ? माझं छप्परच उडून गेलं–!

शिकवली नसती, जुन्या चालीप्रमाणेंच सांभाळली असती तर–तर–पण तिची लहानशी–तेजस्वी—मायाळू नजर मला आकर्षून घ्यायला पुरी होती. मी तिला माझी केली—मोठी केली—ती काय माझ्यासाठीं ?—माझ्या हक्काची म्हणून ? नाहीं—नाहीं. हक्कावर आधारलेल्या सृष्टीला धुमकेतूच्या

शेंड्याइतकीही मजबूती नसते!—असले हक्क त्या शशीला नि शिवगौरीलाच लख-लाभ असोत. मी कर्तव्यावर नजर ठेवून, स्वार्थत्याग करून तिचा नि माझा संबंध जोडला होता. माझी टोपी विकून मी तिला दूध पाजलं—जात विकून मी तिचं पालनपोषण केलं—शहाणपण विकून तिला शिक्षण दिलं—नि आतां ! मनहर ! कर्तव्यसंग्राम पुरा केला पाहिजे. ( डोळे पुसतो ) भवितव्य निराशामय झालं तरी बेहत्तर ! म्हातारपणीं एकटंच—स्वतःच्या हातानें—स्वतःच—एकटयानंच—( आलेला हुंदका ओठ दाबून दाबतो ) कर्तव्यपरायणतेंतही मृगजळ आहे. या मृगजलापासून तृप्तीचं सुख मिळतं हेंही खरं—पण—पण—मृगराज ! या प्रिय मृगजळानंतर मरण्यांतच खरा मोक्ष ! ( शिवगौरी येते. )

**शिवगौरीः**—( हंसत ) कोण मनहरलालशेट ना !—काका ना !

**मनहरः**—( स्वगत ) ही कुब्जा यावेळीं कशाला आली ! (शिवगौरीकडे) काय बेन, कुणीकडे ? नि एकट्याच ?

**शिवगौरीः**—आंत करमेना, वरती आकाश नि खालीं धरणी अशाच ठिकाणीं मला तुमच्याप्रमाणें करमतं.

**मनहरः**—तुम्हांला काव्य कुठून सुचायला लागलं ? माझं डोकं जरा दुखत होतं—

**शिवगौरीः**—( चिंता दर्शवून ) आं—मग सांगितलं कां नाहीं ? अमृतांजन आणूं का ?

**मनहरः**—नको, जरा हिंडलों फिरलें म्हणजे बरं वाटेल आपोआप.

**शिवगौरीः**—हां—चला—मीही फिरतें. फिरलं म्हणजे मलाही बरं वाटेल. हो का ! बरं काका ! ( हंसत ) काका ! शब्द किती चांगला आहे, नाहीं ! मीही तुम्हाला काका म्हणूं का ?

**मनहरः**—माझ्या पुतण्या नि पुतणे यांचं लटांबर एवढं मोठं आहे, कीं त्यातलं एकादा मेला काय कि एक नवा जन्माला आला काय—फारशी तफावत नाहीं !

**शिवगौरीः**—काका ! तुमचं जीवन अगदीं एकलकोंडं—

**मनहरः**—( कडवटपणें ) मला ताडाप्रमाणं एकटं जीवन कंठणं फार आवडतं.

**शिवगौरीः**—या नुसत्या गप्पा—एकलेपणा कंठायला तुमचं हृदय घडवलं नाहीं देवानं !

**मनहरः**—पहा ना ! तुम्हीही माझ्यासारख्या एकट्याच जीवन कंठतां आहां ना ? ( चालूं लागतो. बरोबर शिवगौरी चालूं लागते. )

**शिवगौरीः**—( हंसत ) तुम्हीही एकटे नि मीही एकटी.

**मनहरः**—( तिरस्कारानें ) तुमचं लग्न झालेलं आहे हें एक ठीक आहे. नाहीं तर कुणी म्हटलं असतं आपलं दोघांचं सूत जुळलं आहे किं काय ?

**शिवगौरीः**—( विकारवश नजरेनें ) लग्न झाल्यानंच का सूत जमतं ? आत्म्याचं पोषण होण्यासाठीं लग्नाची जरूरी नाहीं.

**मनहरः**—हा तुमचा अफलातुनी संप्रदाय. हो ना ?

**शिवगौरीः**—( हंसत ) तुम्हीं तर अगदीं सर्व गोष्टी थट्टेवारी नेतां ! Platonic Love अफलातुनी प्रेम हीच या दुनियेच्या अस्वास्थ्याचं किल्ली आहे.

**मनहरः**—असं ?

**शिवगौरीः**—काका—तुमच्या नि माझ्या आत्म्याची जोडी प्रभूनं निर्माण केली आहे. काका ! ( समोर पाहून ) आपल्या आत्म्याचं आकर्षण—

**मनहरः**—पण अहो बाईसाहेब, तुम्ही आहांत अफलातुनी संप्रदायाच्या नि मी आहें ॲरिस्टॉटली संप्रदायाचा.

**शिवगौरीः**—ॲरिस्टॉटली ?

**मनहरः**—माहित नाहीं ! प्लेटोचा गुरुबंधु ॲरिस्टॉटल—

**शिवगौरीः**—( हंसत ) त्याचा काय सिद्धांत आहे ?

**मनहरः**—वाईट वाटून घेणार नसाल तर सांगतों.

**शिवगौरी**:—तुमच्या बोलण्यानं मला कधीं वाईट वाटेल ! सांगा तर खरं.

**मनहर**:—जाऊं द्या हो.

**शिवगौरी**:—अहो, सांगा तर खरं !

**मनहर**:—( गंभीरपणें ) ॲरिस्टॉटलचा असा सिद्धांत आहे, कीं जी बाई आपल्या नवऱ्याचा संसार सांभाळित नाहीं—तिचे नाककान कापून गाढवावर बसून तिची धिंड काढावी—

**शिवगौरी**:—हॅं—हॅं—!

**मनहर**:—( चिडून ) हॅं—काय ? खरं आहे. गांवाबाहेर हांकलून द्यावी—नाक नि कान दोन्ही कापून—

**शिवगौरी**:—काय अपमान—

**मनहर**:—ॲरिस्टॉटलचा सिद्धांत तुमच्या गळीं उतरे तोपर्यंत मी जरा फिरून येतों हं ! ( झपाट्यानें जातो. )

**शिवगौरी**:—( डोळे वटारून ) नाक कान कापायचे ! मेल्या ! माझा अपमान ! मला असं सांगतो ! मला गाढवावर बसवायची ! ह्या वयांत मला हें ऐकावं लागावं ? कुठं गेला भाई ? भाई—कुठं मेला आहेस ? चला, घरीं जाऊंया. एक पळभरसुद्धां इथं राह्यचं नाहीं. मेल्यानं अपमान केला ! अगं मी काय बोललें म्हणून माझा अपमान केला ? बसव ना गाढवावर तुला हवी तिला—मोतीभाई—मोतीभाई !—( जाते. )

**दुर्लभ**:—( एका हातानें इंद्रजीतला खेंचीत येतो. ) पहा—आंधळ्या, ती गेली ती कोण ? तुझी बायको किं कुणी दुसरी ? ( चावीत ) नव्हे—नव्हे—नव्हे किती वेळ सांगतों आहें, पहा—आतां परत येईल. या आडोशाला बस नि आली कीं ते दोघे तिथं बसले आहेत त्यांना बोलाव—मी नि वल्लभभाई त्या तिकडच्या रस्त्यावर बसतों. काय समजलास ?

**इंद्रजीत**:—( धाबरून ) समजलों—

**दुर्लभ**:—काय समजलास ?

**इंद्रजीत**:—( बडबडतो ) तुम्ही त्या रस्त्यावर बसलां आहांत—

**दुर्लभः**—बरोबर. जरासुद्धां घाबरूं नकोस.

**इंद्रजीतः**—( घाम पुशीत ) जरासुद्धां घाबरूं नकोस.

**दुर्लभः**—मूर्खा ! मी बोलतों तेंच काय बोलतो आहेस ?

**इंद्रजीतः**—( चहुंकडे पाहून ) खरं आहे.

**दुर्लभः**—जातों मी.

**इंद्रजीतः**—( कापत कापत ) पण काका–काका !

**दुर्लभः**—काय ?

**इंद्रजीतः**—काका ! तुम्ही इथं राहिलेत नि मी रस्त्यावरच्या मोटारींत बसलों तर ?

**दुर्लभः**—अरे वारे वा बेटया वाः ! जोखीम घ्यावं मी नि बायको घ्यावीस तूं ! चल. उभा राहा घाबरल्याशिवाय ! बापजाद्यांची अब्रू राखायची आहे, तुला आज.

**इंद्रजीतः**—( कळवळून )—काका—काका !

**दुर्लभः**—काय ?

**इंद्रजीतः**—काका, या दुनियेंत कुणाची अब्रू राहिली आहे–ती आपल्या बापजाद्यांची राहाणार ?

**दुर्लभ**—बायल्या–बायल्या ! ती पहा आली, उभा राहा

( झपाटयानें निघून जातो. )

**इंद्रजीतः**—( स्वगत ) बापजाद्यांची अब्रू मी राखायची ? बापजादे कोण? त्यांची अब्रू कुठली ? नि मी ती कां राखावी ? ‘ नलिनी दलगत जलमपि तरलम् तद्वत् जीवित मतिशय चपलम् !’ त्यांत अब्रूला काय करायचं ? ( दांत करकरून ) भज गोविंदम् भज गोविंदम्. कोण आलं ? ( लपून उभा राहातो. कुंदनलाल येतो )

**कुंदनः**—आतां मी साफ मोकळा झालों. जोपर्यंत विधुला मी निर्मल समजत होतों तोपर्यंत तिच्यासाठीं वाटेल ते करायची माझी तयारी होती. सबंध आयुष्यभर खपलों तो काय अशासाठीं ? आतां ती सुटली नि मीही

सुटलों. तिचा मार्ग वेगळा नि माझा मार्ग वेगळा. आतां माझा रस्ता मला स्पष्ट दिसतो आहे. आतां शशीच माझी जीवनसखी !

**इंद्रजीतः**—( स्वगत ) अरे बापरे !

**कुंदनः**—किती सहज आम्ही एकमेकांना ओळखतों ! यापूर्वीच ती मला भेटती तर मी आज सॉलिसीटर राहिलों नसतों—न्यायमूर्ति होऊन बसलों असतों ! तिच्यामुळं माझ्या बुद्धीला चालना मिळते. किती चहाते मला ती ! मला कुंदनलाल म्हणून किती गोड हांक मारते ! कुणी सुद्धां अशी गोड हांक मारली नव्हती ! उच्चारा उच्चारांत प्रेम झरतं आहे ! नि आतां ती स्वतंत्र झाली.—पण विधूचं काय ? ती जाईल माहेरीं—पण एकीवर दुसरी व्हायला शशी तयार होईल का ?

**इंद्रजीतः**—( स्वगत ) शिव ! शिव ! शिव !

**कुंदनः**—( हंसत ) लोक निंदा करतील, पण—पण—त्यांत काय ? घटस्फोटाचा कायदा असता तर किती चांगलं झालं असतं ! रूक्ष लग्नरुपी पिंजऱ्यामध्ये प्राण कोंडून ठेवण्यापेक्षां त्याला मोकळा सोडला पाहिजे. विजोड जोडप्यांची लग्नं लावण्याच्या या रिवाजामुळंच हिंदुस्तानचा सत्यानाश झाला !

**इंद्रजीतः**—( स्वगत ) भाई, हिंदुस्तान तारणं आतां तुझ्याच हातीं आहे ! शांतम् पापम् ! शांतम् पापम् !

**कुंदनः**—ही आलीच ! चालते किती सुंदर ! रोमारोमांतून छटा उधळताहेत !

**इंद्रजीतः**—( स्वगत ) हरहर ! नारीस्तनभर नाभि निवेशम्—मिथ्या माया मोहावेशम् !

**कुंदनः**—( छातीवर हात ठेवून ) ही जसजशी डोलते आहे तसतसा माझा आत्माही डोलतो आहे.

**इंद्रजीतः**—( स्वगत ) एतन्मांसवसादिविकारम्— ( शशीकला येते )

**शशिः**—काका ! ( कुंदनलालला पाहून ) काका नाहींत ? तुम्ही पाहिलेत ?

**कुंदनः**—( हंसत ) नाहीं.

**शशि**:—नि गुलाबदास ?

**कुंदन**:—( हंसत ) नाहीं.

**शशि**:—गेले तरी कुठं हे दोघे ?

**कुंदन**:—असतील कुठंतरी ! कशाला काळजी करतां ?

**शशि**:—आज सकाळपासून काका जसें कांहीं वेगळे झालें आहेत माझ्यापासून !

**कुंदन**:—हें तर खरंच. आपण सकाळीं गोष्ट काढतांनाच त्यांची मिजाज बिघडली. हातचा पैसा घालवणं कुणाला आवडेल ?

**शशि**:—न हे—कुंदनलाल ! तुम्ही चुकतां आहांत. माझ्याशीं काका असे कधीच वागले नाहींत. पोटच्या पोरींपेक्षांही ते मला जास्त लेखतात.

**कुंदन**:—( हंसत ) तुम्हांला कोण असं लेखणार नाही ?

**शशि**:—कुंदनलाल ! तुम्ही माझे मित्र आहांत—

**कुंदन**:—होय. का ? काय आहे ?

**शशि**:—( मग एक विचारूं ?—गुप्त ठेवा. मला आज एक संशय आला आहे.

**कुंदन**:—कसला ? ( जवळ येतो )

**शशि**:—काकांनी लग्न कां नाहीं केलं तें मला उमगलं आज ! लग्न केलं तर त्यांची बायको मला त्रास देईल, याच भयानं त्यांनीं लग्न केलं नाहीं.

**कुंदन**:—हो हो हो शशीबेन ! जितक्या तुम्ही निष्कपटी आहां तितकाच तुमचा संशय सुद्धां निष्कपटी—निर्मल आहे ! खरं कारण सांगू ?—मला वाटतं, तुमच्याशींच लग्न करायची इच्छा असेल म्हणून नसेल लग्न केलं !

**शशि**:—( खदखदां हंसून ) Nonsense ! कुंदनलाल ! काय Stupid बोललात ! सॉलिसिटरला शोभण्यासारखं कारण शोधून काढलंत ! तुम्हां लोकांना स्वार्थाशिवाय दुसरं कांहींच का दिसत नाहीं ?—तर मग त्यांनीं माझ्याशीं लग्न कां केलं नाहीं ?

**कुंदन**:—My innocent queen ! तुमच्यासारखी सुशिक्षित स्त्री का होकार देईल ? नाहीं एवढं समजण्याइतकं ते पक्के आहेत.

शशिः—Nonsense ! तर मग आज सगळं माझ्या हवालीं करून मला स्वतंत्र कां करताहेत ?

कुंदनः—न करून सांगतील कुणाला ? तुमच्या व्यक्तीत्वाला ते डरतात.

शशिः—साफ खोटं. पण तुम्ही कां आज असे चवताळल्यासारखे फिरतां आहांत ? विधुबेन कुठं आहे ?

कुंदनः—( धीमेपणानें ) शशीबेन ! एक खाजगी गोष्ट तुम्ही मला सांगितली-मी सांगू का तुम्हांला दुसरी ?

शशिः—हो. सांगा—काय आहे ?

कुंदनः—तुमचे नि माझे विचार जुळतात—मी तुम्हांला कांहींही सांगितलं तर तें तुम्हांला पटेल याची मला खात्री आहे.

इंद्रजीतः—( स्वगत ) ठार मारलं ! यानं तर ताळच सोडला. शिव-शिव-शिव !

कुंदनः—आज विधु माझ्या जिवनांतून लुप्त झाली.

शशिः—( चमकून ) विधुबेन जीवनांतून लुप्त झाल्या ? काय बोलतां हें ?

कुंदनः—होय. तिच्याबद्दलचं माझं कर्तव्य संपलं.

शशिः—असं कां म्हणतां ? ' भलूं थयूं ने भांगी जंज़ाळ ' म्हणून नरसिंह मेहतानीं गायलं—तसं का बोलतां !

इंद्रजीतः—( स्वगत ) अगबाई ! त्यांना सुखानं हरी हरी करीत नाहीं यशवत नरसी मेहत्यासारखं.

कुंदनः—( सुस्कारा टाकून ) हं ! आतां तुम्ही नि मी सुखानं मित्रत्व राखूं. आतां मी स्वतंत्र झालों नि तुम्हीही स्वतंत्र झालां. आपल्या आत्म्याचं ऐक्य आहेच—आपण आतां निरंकुश जीवन घालवूं.

शशिः—काय बोलतां कुंदनलाल ?

कुंदनः—(शशिकलेचा हात पकडून) शरमूं नको, शशिकला ! मी पाहातों आहें. संसाराची माझी भूक भागली आहे. तुझा सहवाससुख हाच माझा मोक्ष! आतां आपण उभयतां—

**शशि**:—( हात हिसकावून घेऊन दूर सरते ) कुंदनलाल ! काय बोलतां आहांत याचं भान आहे का तुम्हाला ?

**कुंदन**:—भान ?—भान आहे. माझे डोळे पूर्ण उघडले. तुझ्या नि माझ्या नेत्रातून ओसंडणाऱ्या अमृताचं रहस्य मला जाणवलं. प्राणेश्वरी !—

**शशि**:—कुंदनलाल ! कुणाला म्हणतां हें ? दारु प्यायला आहांत ?

**कुंदन**:—होय. तुझ्या प्रणयाची—

**शशि**:—( चिडून ) प्रणयाची ! तुमची रखेली होऊं म्हणतां ? एक शब्द जास्त बोलाल तर जीभ उखडून काढीन.

**इंद्रजित**:—( बाही सरसावून–स्वगत ) होऊं का पुढं ?

**कुंदन**:—( धीटपणें जवळ जाऊन ) शशी ! अशानं मी फसणार नाहीं, तुझं मधुर हास्य, तुझं गोड भाषण–सारं कांहीं मला समजलं आहे—( आणखी जवळ सरकतो. )

**इंद्रजीत**:—( बाही चढवून–स्वगत ) जाऊं का पुढं ?

**शशि**:—( रागानें ) नीच ! ( मागें सरकून ) तुला वाटलं, कीं मी तुला चाहातें म्हणून ? मदांध ! खबरदार एक पाऊल पुढं टाकशील तर !

**कुंदन**:—मग–माझ्याशीं खेळ खेळत होतीस ?

**शशि**:—( खंवचटपणें ) हो. हृदयाशीं खेळ ! तुझ्या रूपगुणावर मी फिदा झालें असं समजत होतास तूं ? नीघ इथून. नाहीं तर–काका, अहो काका ! ( जाते )

**इंद्रजीत**:—( स्वगत ) असारसंसार समुद्रमध्ये । निमज्जतो मे शरणं किमस्ति ?

**कुंदन**:—( शरमून घाबरटपणें पाहात ) काय केलं मी हें ? ( घाम पुसतो ) शशीचा मी अपमान केला ! तिनं मला धि:कारलं ! हाय ! माझी अब्रू नि प्रतिष्ठा ! उद्यां जग काय म्हणेल ? विधु काय म्हणेल ?.....अरेरे एका सामान्य भेंडीबाजारांतील मवाल्याप्रमाणं मी तिचा अपमान केला!...शशिकलेनं माझ्याशीं–हाय ! काय झालं मला ? माझी अक्कल कुठं गेली ? उद्यां काय होईल ? ( जीभ चावून ) अरेरे ! हें काय होऊन गेलं ?

**इंद्रजीतः**—( स्वगत–आकाशाकडे पाहून ) अहह गहनो मोह महिमा !

**कुंदनः**—या एका छेलछबेलीमागं लागून मी वेडा झालों नि विधुला टाकली. अरेरे !

**विधुः**—( मागून येते, दचकते ) हे इथं काय करताहेत ?

**इंद्रजीतः**—( स्वगत ) पापाचं प्रायश्चित !

**कुंदनः**—विधुला विसरलों—

**विधुः**—( चमकून ) विधु !–

**कुंदनः**—अरेरे ! काय केलं मी हें ?–माझी मति कशी भ्रष्ट झाली ? इतकीं वर्षे जिनं माझी मनोभावानं सेवा केली तिला बिचारीला लाथ मारली ! हें मी काय केलं ?

**विधुः**—माझे कुंदन अखेरीस माझेच राहिले !

**कुंदन**—उद्यां जग काय म्हणेल ?–कुठं जाऊं ?–उद्यां जगाला कळण्यापूर्वी मेलेलं फार चागलं !–विधुचं काय होईल ? ( वर पाहून ) विधु !

**विधुः**—( धांवत पळत येते ) नाथ !

**कुंदनः**—( तिला जवळ ओढतो शरमेनं खालीं पाहात ) विधु !

**विधुः**—आतां कांहीं बोलायचं नाहीं. ऐकलं, मी सारं कांहीं ऐकलं.

**कुंदनः**—( चमकून ) काय ऐकलंस ?

**विधुः**—एकटे एकटेच बडबडत होतां तें. 'मति भ्रष्ट झाली' नि 'मरणं उत्तम' वेडे कुठले !–माफ करा मला. आतां खरं सांगतें तुम्हाला, तुम्हांला अद्दल घडावी म्हणून तो मी एक उपाय केला. सबंध रात्र मी तर शिवगारीकडेच बसून होतें !—

**कुंदनः**—काय सांगतेस ?

**विधुः**—( लडिवाळपणें ) स्वप्नांत तरी आपला विसर मला पडेल ? काय वाटलं तुम्हांला ? तुमच्याशिवाय कोण आहे माझा दुसरा प्रभू ?

**कुंदन**—विधु ! मी एक अब्रूदार सद्‌गृहस्थ आहें असा का तुझा समज आहे ? नाहीं, मी अधम आहें, भेंडीबाजारांतील मवाली आहें.

**विधुः**—माझी शपथ आहे असं बोलाल तर ! तुम्ही देव आहांत ! तुमच्या भलाईचा दुसरे उपयोग करून घेतात, हें मला काय माहीत नाहीं ?

**कुंदन**—विधु ! ( केविलवाणें ) तुझा विश्वास आहे माझ्यावर ?

**विधुः**—श्वास नि प्राण एक आहेत तोंपर्यंत !

**कुंदनः**—तर मग विधु, तुझ्याजवळच मला ठेव. माझा माझ्यावर विश्वास नाहीं राहिला. ब्रह्मराक्षस आहें मी ! चल–चल–जाऊं–तूं नि मी. आतां मला दुसऱ्या कुणाची जरूर नाहीं. नि विधु ! आपण जाऊं-तूं जाऊन शशिबेनचा निरोप घे.

**विधुः**—( हंसत ) तुम्ही चला ना !

**कुंदनः**—नको, तूं जा. तूं असल्यावर मला कुणाची पर्वा नाहीं. मला तूंच हवी आहेस.

**विधुः**—( बिलगून ) नाथ, तुमची इच्छा मीच जाणतें. शशीबेनना नाहीं कळवलं तर काय होईल ? उद्यां माफी मागूं त्यांची. चला तर–चालत जाऊं, आपली मोटार तिकडेच आहे. चांदण्यांत असं फिरणं किती गोड वाटेल! ( चहुंकडे पाहून आलिंगन देते. )

**कुंदनः**—खरं आहे. हें स्थळ मला जहराप्रमाणं भासतं आहे. चल. मला एक पळही इथं राहायचं नाहीं-[ विधुला धरून जातो. ]

**इंद्रजीतः**—[ बाहेर येऊन ]

> वृद्धो याति गृहीत्वा दंडम् । तदपि न मुंचत्याशापिंडम् ।
>
> भज गोविंदम् भज गोविंदम । भज गोविंदम् मूढमते–

कशी दुनिया आहे ? शिव ! शिव शिव ! !

[ शिवगौरीला येतांना पाहून चमकतो–तसाच अंधारांत हळुहळु नाहिंसा होतो. ]

**शिवगौरीः**—मेला–पाखंडी–ह्यं: ( डोळे चोळते–डोळ्यावर हात ठेवते थोड्या वेळानें ) या चांदण्यांत मला आतां कोण दिसलं ? ( दरडावून ) कोण आहे ?–कोण ?

**इंद्रजीत**—( कापत कापत ) चला शिवकवच म्हणूं–ओं नमो भगवते सदाशिवाय सकल तत्वात्मकाय–

**शिवगौरी**—( स्वगत ) त्या मेल्याचंच भूत दिसतं ! त्या नामधाऱ्याचं भूत लागलं किं काय माझ्या मागं ?

**इंद्रजीत**ः—( स्वगत ) सर्व मन्त्रस्वरूपाय सर्व मंत्राधिष्ठिताय—

**शिवगौरी**—[ स्वगत जोरानें ] तो मेला रोज जंतर मंतर करी. त्यानं माझ्या मागं भूत लावल किं काय ? मी डरतें वाटतं अशाला ? [ चहुंकडे पाहून ] निव पगडीवाल्या—मेल्या !

**इंद्रजीत**—( थरथरत-स्वगत ) सर्व तत्त्व विदूराय ब्रम्हरुद्रावतारिणे—

**शिवगौरी**—सत्यानाश केला माझा !—माझ्या आयुष्याचं मातेरं केलं नि मेला आतां माझ्यामागं भूत लावतो ! कोण आहे तें ? (चहुंकडे रागानें पहात) आण—आण—तुझं भूत नि प्रेत सगळ्यांना पुरून उरेन मी !

( गंगा बेन येते )

**गंगा**ः—काय आहे-शिवगौरीबेन ! कां ओरडलां ?

**शिवगौरी**ः—( डोळे वटारून ) तुम्ही सर्वांनी मला इथं बोलावून काय करायचं ठरवलं आहे ? एक मेला भूत होऊन पाठीं लागला आहे नि दुसरा मेला म्हणतो, कीं मला गाढवावर बसवून गांवाबाहेर काढावी !

**इंद्रजित**ः—( बडबडत चटकन् जातो ) नीलकण्ठाय पार्वती मनोहर प्रियाय सोमसूर्याग्नि लोचनाय भस्मोद्धूलित विग्रहाय महामणि—मुकुट—धारणाय माणिक्य भूषणाय—

**गंगा**ः—( सहानुभूतीनें ) अहो असं का बोलता ? वेड लागलं किं काय ? भूत कसलं ?—गाढव कसलं ?

**शिवगौरी**ः—आतांच त्या मेल्याचं भूत पाहिलं.

**गंगा**ः—( चसकून ) कुणाचं ?—तुमचे—

**शिवगौरी**ः—हो.

**गंगा**ः—मग—भ्यायलां वाटतं !

**शिवगौरी**ः—मीं भीतें ? जसं कांहीं या भुताला मी भिऊन जाईन ! त्याचं भूत दिसलं तर एवढंच मला नक्की करायचं, कीं त्याच्या नांवाचा चुडा

फोडायचा किं तोडायचा ? मोतीभाई कुठं गेला ! मोतीभाई ! मला इथं नाहीं राहायचं, माझं मस्तक भडकलं आहे आज.

**इंद्रजीतः**—सृष्टिस्थिति प्रलयकाल रौद्रावताराय दक्षाध्वरध्वंसकाय महाकाल भेदनाय–मूलाधारैकनिलनाय—

**गंगाः**—( हंसं दाबीत ) असंच वाटतं, पण तें त्या गाढवाचं काय ?

**शिवगौरी**—त्या मेल्या काकांनं माझा अपमान केला.

**गंगाः**—मनहरशेटनीं ! काय बोलतां ! असं नाहीं व्हायचं.

**शिवगौरीः**—मग खोटं हें ? मी अफलातुनी प्रेमाच्या गोष्टी करीत होतें—

**गंगाः**—मग ?—

**शिवगौरीः**—तर मेला काय म्हणतो-–ॲरिस्टॉटलचा सिद्धांत आहे—

**गंगाः** कोणता ?—

**शिवगौरीः**—कीं नवऱ्याचा संसार करणार नाहीं तिला नाककान कापून गाढवावर बसवून गावाबाहेर हाकलून ! द्यावी काय मेला सांगतो !

**इंद्रजीतः**—( स्वगत ) धन्य मनहर शेट !

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्

**शिवगौरीः**—बसवा म्हणावं गाढवावर तुमच्या त्या फटव्या नटवीला !

**गंगाः**—( हसूं दाबून ) अहो बेन, जरा धीरानं घ्या. चांगलं नाहीं दिसत हें ! मोतीरामला बोलावून घेऊन घरीं जा. चला मी शोधून काढतें त्याला !

**शिवगौरीः**—असं वाटतं–कुणाचं तरी डोकंच फोडावं–( दोघी जातात )

**इंद्रजीतः**—( बोलत बाहेर येतो ) तत्त्वातीताय गंगाधराय सर्व देवाधिदेवाय षडाश्रयाय वेदान्तसाराय—निघून गेली ? गेली ! ( सुस्कारा टाकून ) अरेच्या ! ही तर गेली नि हिला पळवायची होती तें राहूनच गेलं. अग आई ! तो दुर्लभरामभाई नि वल्लभराम काका काय म्हणतील ? ते मवाली काय म्हणतील ? मोटार तिथं उभी आहे नि मी विसरून गेलों—शिव ! शिव ! शिव ! ( हात जोडून ) दीनानाथ !

दीनबंधु ! झालं तें ठीकच झालं ! पार्वतिपते ! आपली कृपा ! आज जर मी नेली असती तिला, तर माझं भूत खाईन म्हणणारी मलाच—! अरे बाप रे ! मी भूत होईन तेव्हां खात्री होईल कीं ही चुडा फोडते कि नाहीं ?

**गंगाः**—( येते ) कोण ?–भाई ?

**इंद्रजीतः**—( दचकतो. पण गंगाला ओळखल्यावर ) कोण बेन ?

**गंगाः**—इकडे कुणीकडे तुम्ही ?

**इंद्रजीतः**—( चष्मावर करून ) शिवगौरीला पळवून न्यायला आलों होतों. वाहान तयार आहे, पळवणारा तयार आहे- पण—

**गंगाः**—( हेतुपूर्वक ) पण—

**इंद्रजीतः**—मला ज्ञान प्राप्त झालं. माझा भोलानाथ धांवून आला. मी शिवकवच म्हटलं नि मला ज्ञान प्राप्त झालं—

**गंगाः**—काय ?

**इंद्रजीतः**—इथं ती आली–एकटी होती. पळवावी असं मनांत आलं नि राजा भर्तृहरीच्या शब्दांतून भोलानाथानं मला ज्ञान करून दिलं—

रे कंदर्प करं कदर्थयसि किं कोदंडटंकारितैः ।
रे रे कोकिल कोमलः कलरवैः किं त्वं वृथा जल्पसि ।
मुग्धे स्निग्ध विदग्ध मुग्ध मधुरैर्लोलैः कटाक्षैरलम् ।
चेतश्चुंबितचंद्रचूडचरणं ध्यानामृतं वर्तते ॥

**गंगाः**—चला भाई, निरांत झाली ! तुम्ही शिवगौरीला आणायला सांगितलें तेव्हांच मला वाटलं–तुमची तपश्चर्या ढांसळली !

**इंद्रजीतः**—( हंसत ) तप ढांसळतं कसं ?–बरं ! जातों आतां.

**गंगाः**—चला–मीही येतें. कुणाला माहीत पण कुणाचंच मन इथं थाऱ्यावर दिसत नाहीं. सगळे एकेकटे बावरल्यासारखे फिरताहेत. अशावेळीं मला कोण इथं सांभाळणार आहे ? चला.

**इंद्रजीतः**—( हंसत डोक्यावर हात ठेवतो ) माझं मन शांत झालं. शंकराला रोज लघुरुद्र करायचा नवस केला आहे मी.

**गंगाः**—( हंसत ) शिवगौरी येईपर्यंत रोज गीतेचा सोळवा अध्याय पठण करायचा मीही नवस केला आहे.

**इंद्रजीतः**—चला आतां सुखानं तरी राहीन.

**गंगा**.—नि मी बसून गीता वाचीन.

**इंद्रजीतः**—( चष्मा काढून साफ करतो ) नि आपण दोघेंही शांकरभाष्य बरोबर वाचूं. चला—ती मोटार ( दोघें जाऊं लागतात )

**दुर्लभः**—( येऊन ) ए ! काय करतो आहेस इथं ? किती वेळ झाला ? बसून बसून थकून गेलों.

**इंद्रजीतः**—( हात जोडतो ) माझ्या शहाण्यानों, माझ्या मातापित्यांनो, देवानों, हात जोडतों—पाया पडतों—जाऊं द्या मला.

चेतश्चुंबितचंद्रचूडचरण ध्यानामृतं वर्तते ।

**दुर्लभः**—अरे चुंबन नि चुडावाला -( इंद्रजीत पळत जातो ) हत्त तुझ्या ! बायल्या ! धुळ घातली बापजाद्यांच्या अब्रूवर !

( काठी हालवीत जातो )

**शशिः**—( हातांत कागद घेऊन येते ) काका कुठं गेले ? काय केलं हें काकांनीं ? एवढं सगळं ?—( कागद काढून वाचते )

“ शशी, तुझा सकाळचा प्रश्न खरा आहे. तुला अर्धा हिस्सा मी दिला पाहिजे. यासोबत माझ्या मिळकतीचा हिशोब नि अर्धा हिस्सा देण्याची कबुलायत आहे. गुलाबदासना बरोबर दस्ताऐवज करून देण्यास सांगितलं आहे.

मनहरलाल. ”

हा काय जुलूम ! वीस वर्षांच्या स्वतःच्या कमाईतील मला अर्धा वांटा ? छे—छे—मी नाहीं घेणार मी काय धर्मादाय मागत होतें ?

**गुलाबदासः**—( पान खात येतो ) अरे हे सगळे गेले कुठं ? जरासं खाऊन कुठं झोपलों, तो गेले सगळे ! बेन, काका कुठं आहेत ? जातों आतां मी. आमच्यासारख्या म्हाताऱ्या माणसांनीं फार वेळ हवा खाणं बरं नव्हे.

**शशिः**—मीही काकांनाच शोधतें आहें—पण गुलाबदासभाई, काकांना असं करणं शोभत नाहीं. हें तर धर्मादाय—

**गुलाबः**—( डोक्यावरची पगडी सांवरीत ) अरे–तुमच्या सारख्या नव्या छोकरींना मग हवं आहे तरी काय ? बिच्याऱ्यानं आठ लाख दिले, तेव्हां बापाचा हिस्सा मागीतलास ! बिचाऱ्यानं सर्व मिळकतीचा अर्धा हिस्सा दिला, तर धर्मादाय वाटूं लागला ! अरे, तुम्हां आज कालच्या जमानावाल्यांना झालं आहे तरी काय ? त्या बिचाऱ्या सोन्यासारख्या माणसाकडे हिशेब मागायला बसलीस नि बिचाऱ्याचा जीव कासावीस केलास ! ( पान खात ) आजकालची दुनिया पाहून माझं तर डोकं उठून जातं. साला प्रामाणिपणा कुठं राहिलाच नाहीं !

**शशिः**—( घाबरून ) पण गुलाबदास भाई, मला कुणाचा हरामाचा पैसा कुठं पाहिजे आहे ? मला माझा हक—

**गुलाबः**—( पान चावतांना चिडून ) मला भडकावूं नको ! तूं, तुझा हक्क ! माझ्या मुलासारखा तो, त्याचा जीव घाबरा होतोय तें नाहीं पाहावत मला ! बाई तुझा हक्क––

**शशिः**—माझ्या वडिलांचा पैसा—

**गुलाब**––अग बाई, तुझा बाप नि तुझी आई नि तुझा आजा नि तुझी आजी, कुणी कधीं पाहिलीं होती ? हीं सारी कुणीं, म्हणजेच तो—मनहरशेट ! मी म्हातारा माणुस सांगतों आहें हें.

**शशिः**—पण माझे वडील भागीदार––

**गुलाबः**—ए बापाच्या पोरी, ऐक. हा मनहर मुंबईला आला तो तुला दोन वर्षांची असतांना घेऊन आला. कोट विकून मुंबईला आला नि माझ्या घराशेजारीं टोपी विकून दूध घेतलं त्यानं–तें तुला पाजतांना माझ्या मोठ्या भावानं पाहिलं नि नोकर ठेवला याला त्यानं—

**शशिः**—( चकित होऊन ) मग काय–हे नि माझे वडील भागीदार नव्हते ?

**गुलाबः**—( तपकीर ओढून ) तेंच सांगतों आहें ना ! हा काय जमाना झाला. ! उथळ पाण्याला खळखळाट फार ! पगाराच्या मोबदल्यांत तुझं पालन–पोषण करायचं–पैसा घेतला नाहीं त्यानं–( शशिकला ओंठ दाबून चिंताग्रस्त

होते ) असावा माणूस तर मनहरसारखा ! माझ्या पुतण्याला शाळेला घेऊन जायचं नि शाळा सुटतांच घेऊन यायचं. मोटाभाईनं दोनशें रुपये देऊन फेरी करायला पाठवला त्याला—त्यावरच आजचा हा पसारा वाढला. तो बिचारा एक रुपया मागं चार आणे आमच्या पेढीवर तुझ्या नांवें जमा करी—नि तूं बापाचा भाग मागायला निघालीस ? बाई, एवढयासाठींच आम्ही म्हणतों, ना ? अशा जुन्यां नजरेंनं नवे तमाशे बघण्यापेक्षां आतां लवकरच डोळे मिटावे. सालं कलीयुग ! सांग मनहरला, मी गेलों म्हणून. ( आसवं पुशीत, नाक शिंकरीत जातो )

शशिः—( वर पाहाते- हुंदके देते नि रडूं लागते ) नि मला हक्क पाहिजेत—स्वतंत्र व्हायला पाहिजे—वडिलांचा हिस्सा पाहिजे ! हे भगवन् ! ( गुढघ्यांत मान घालून रडूं लागते. गौरीशंकर येतो )

गौरीशंकरः—( काव्याच्या निशेंत चूर होऊन ) मी—तूं नि चांदणी ! कोण ? शशिबेन ? मी तुम्हांलाच शोधीत होतों. (शशिकला वर पाहते. कपडे ठाकठीक करून बसते ) जेव्हां मी तुम्ही सागर नि चंद्रिका एकत्र मिळून हृदयं उघडूं त्याच क्षणाची मी वाट पाहात होतो.

शशिः—( सुस्कारा टाकून ) हृदय उघडण्याची ही वेळ नव्हे. मला वाटतं, सर्वांना बोलावून जायला सांगूं या.

गौरीशंकरः—( हसत ) जरा धीमे—जरा आस्ते. असं रमणीय स्थळ, असं सागर संगीत, ही मादक चंद्रिका, नि अशीं तुम्ही नि मी—पुन्हां केव्हां एकत्र येणार आहोंत ? तुमचा आत्मा संवादी नृत्य करीत नाहीं का ? मला ऐकूं येतं आहे—

शशिः—( कंटाळून ) तुम्ही आहांत कविराज, तुम्हांला ऐकूं येतंत आम्हांला कसें ऐकूं येईल ?

गौरीशंकरः—तुम्हांला नाहीं वाटत, कीं भवितव्यरुपी नदीकिनारीं दोन सारस पक्षाप्रमाणें आपण उडतों आहों असं ?

शशिः—माझं डोकं दुखतं आहे. आतां—आतां घरीं जावंसं वाटतंय् मला !

गौरीशंकरः—अशाच वेळा मला एक याचना करायची आहे.

शशिः—कसली ?

गौरीशंकरः—उद्यां तुम्ही स्वतंत्र व्हाल, त्यावेळीं सम्राज्ञीच्या रिकाम्या सिंहासनावर आरूढ व्हाल! सुभगे, अनादि कालापासून तें तुमच्यासाठीं रिकामं राहिलं आहे!

शशिः—काय म्हणतांहांत तुम्ही?

गौरीशंकरः—माझं म्हणणं नवं नाहीं नि जुनंही नाहीं. सृजन जुनं—पण आहे अगदीं नवोनव! हें निःशब्द निमंत्रण तुम्ही केव्हाचं ऐकलं आहे—नि स्वीकारलंही आहे.

शशिः—तुमच्या घरीं यायचं? मला नाहीं समजत. उद्यां बोलूं. (उठूं लागते)

गौरीशंकरः—(ओढून बसवतो) उठायचं नाहीं. तें निमंत्रण मी उच्चारतों–सागरच्या चंद्रिकेच्या साक्षीनं—सखी, देवी, याल का या हृदयमंदिरांत?

शशिः—(रागानें) You idiot! काय म्हणतोस?

गौरीशंकरः—माझ्या याच मागणीची तुम्ही वाट पाहात होतां! देवी, माझी नि तुमची रसग्रंथी आ ल्या रसिक हृदयांनीं स्वीकारली आहे—

शशिः—(तिरस्कारानें गौरीशंकराच्या तोंडावर रेती फेकते) Fool! माझ्याशीं लग्न करण्याची इच्छा बाळगतोस?

गौरीशंकरः—देवी! प्रभुतेंत पाऊल टाकण्याची इच्छा आहे खरी!–पण बोला, केव्हां?—

शशिः—(रागांत) केव्हां करूं लग्न तुझ्याशीं? ही तुझी आदर्शमयता? मी तुझ्याशीं लग्न करूं? तुझ्याशीं लग्न करण्यापूर्वीं विष खाईन–त्यापेक्षां माझ्या घाटी रामाशी लग्न करीन–समजलास? खबरदार पुन्हां बोललास तर! (उभी राहाते)

गौरीशंकरः—(उभा राहून तिचा हात पकडतो) सुभगे, गरम होऊं नका, पण माझं चित्त तुम्ही चोरलं आहे, हृदय कैद केलं आहे. आतां कुठं जाल? विसरलां? मला कैद केलं! आतां कुठं जाल?—मला बांधून कशा सुटाल?

**शशिः**—मी तुला प्रेमांत पाडलं ? वारे वा ! निर्लज्जपणाची कमाल झाली ! सोड माझा हात. ( हात सोडवूं लागते )

**गौरीशंकरः**—( गळगळून ) म्हणजे माझ्याशीं नाहीं लग्न करणार ? मला फसवतां आहां देवी ! माझ्या साऱ्या मनोरथांना तुम्ही जमीनदोस्त का करणार ?

**शशिः**—( दरडावून ) अशाचा असा चालता हो ? नाहींतर आतां हाका मारून माणसं गोळा करीन.

**गौरीशंकरः**—( रडत—रागानें ) हें काय करतां ?—हें काय करतां ? माझं हृदय चिरून टाकतां ? सुभगे, –

**मनहरः**—( पाठी मागून येऊन ) काय आहे गौरीशंकर ! असे रडतां कां? ( शशिकला खाली मान घालून उभी राहते )

**गौरीशंकरः**—कोण शेट ? माझ्या संकटाला धावून आलां. या सुभगेनं मला हास्यकटाक्षानं निमंत्रवलं, कूजन आव्हानानं लोभ लावला, रसशृंखलेनं बांधून टाकलं—मी पराधीन झालों. माझं काव्यानं ओतप्रोत भरलेलं हृदय हिच्या चरणीं वाहिलं नि आतां लग्न करायला नाहीं म्हणते !

**मनहरः**—( हंसत ) Shame ! शशी ! याच्याशीं कां नाहीं लग्न करित?

**शशिः**—तोंड पहा मेल्याचं !

**मनहरः**—( हंसत ) ती तर नाहीं म्हणते ! तुमचं तोंड पाहाण्याचीही तयारी नाहीं तिची !

**गौरीशंकरः**—हृदयमीलनाला तोंड कशाला नि डोकं कशाला हवं ! ( कळवळून ) हे काय केलंस ? माझं हृदय—काव्यरस झिरपणारं, धगधगणार, सुकुमार कविहृदय बांधलंस, करकचवलंस ? शशी ! हे काय केलंस ?

**मनहरः**—हरकत नाहीं. उद्यां ठीक होईल. एक कविता कर ना !

**गौरीशंकरः**—( ओरडून ) लिहीन—लिहीन. एक नव्हे अनेक, काव्य नव्हे महाकाव्य नि ओळन् ओळीवर या निर्दयेचं प्राणभेदक नांव कोरीन. ( रडत रागानें ) ब्रम्हांडाच्या इतिहासकालाला ओरडून सांगेन, कीं या हतभागिनीनं माझा प्राण हिरावून घेतला नि निष्प्राण केलं मला! माझा प्राण—

**मनहरः**—( हंसत ) कविराज, आतां जा–

**गौरीशंकरः**--हो-जातों-जातों, पण कित्येक वर्षांनंतर जेव्हां दाही दिशा माझ्या नांवावर पडदा पडेल, जेव्हां जगत्कलाधीशाला माझं अमरत्व सिद्ध करून निमंत्रवीन, तेव्हां माझ्या आत्मसत्राच्या महानप्रसंगी-निर्दय-तूंच पस्तावशील नि रडशील-तुझा आजच्या नकारामुळं अनंत कालावर नकाराचा पडदा पडलेला तुला दिसुन येईल.

**मनहरः**—( चिडून ) आतां जाल ?-

**गौरीशंकर**—( मिजाशींत ) हां-जातों. आतां मी इथं उभा राहाणार नाहीं नि-

**मनहरः**--Thank you जा.

**गौरीशंकरः**—( जातां जातां ) 'ब्रम्हांडना इतिहास कांई ओ पेख तुं-'

[ जातो. ]

**मनहर**--( दिलगिरी दर्शवीत ) शशी, ऊठ-फार वेळ झाला. मला वाटतं, सगळे गेले. आतां मीही जातों.

**शशि**—काका, कुठं जातां ?

**मनहरः**—माझ्या घरीं,

**शशिः**—काका, मलाही न्या बरोबर.

**मनहरः**—नाहीं. शशी, माफ कर, इतकीं वर्षे एकत्र राहिलों पण आज-तुला तिकडे पोंचवायला मी येणार नाहीं. मी जातों.

**शशिः**—काका, जाल तर माझी शपथ-( मनहरलाल परत बसतो ) मला विचारायचं आहे. ही अर्धी मिळकत तुम्ही काय म्हणून मला दिली ?

**मनहरः**—शशी, मी तुझ्या बापाची चार आणे मिळकत धरली होती, ती चूक होती. सारखी मानायला पाहिजे होती. ती चूक मी सुधारली. ( उठूं लागतो. )

**शशिः**—( रागानें ) बसतां कीं नाहीं ? मला सगळं सांगतां किं नाहीं ? मला तुमची मिळकत नको नि हिस्साही नको. ( कागद फाडून टाकते ) सांगा. मला सगळं समजलं. मुंबईला कुणी आणलं मला ? टोपी विकून दूध कुणी पाजलं मला ? पगाराच्या मोबदल्यांत पोसायला कुणी दिलं मला ? सांगतां किं नाहीं ? बसा.

**मनहरः**—( गंभीरपणें उठून उभा राहातो ) शशी, तो गुलाबदास आहे वेडा. त्याचं आतां काय ? उद्यां बोलूं.

**शशिः**—( उभी राहते. हात खेंचून खालीं बसवते. ) सांगतां कीं नाहीं ? उठायलाच देणार नाहीं. बसा. सगळं सांगा मला. मी कोण ? तुम्ही कोण ? माझे वडील कोण ?

**मनहर**-( स्नेहार्द्र नजरेनें ) यावेळीं मला सांगतां येणार नाहीं.

**शशिः**--आतांच सांगितलं पाहिजे, न सांगाल तर तुमच्या शशीची तुम्हांला शपथ आहे.

**मनहरः**—शशी, सारं कांहीं आवरतं तुला पण जिज्ञासा मात्र आवरतां येत नाहीं. मला आतां सांगता येणं शक्य नाहीं. समज कां तें.

**शशिः**—आतांच मला ऐकायचं आहे. सकाळीं पुन्हां तुम्ही शाहाणेसुरते व्हाल. तेव्हां नाहीं मला ऐकायचं. बोला, सांगतां कीं नाहीं ?

**मनहरः**—ऐक तर. ( थोडा वेळ समुद्राकडे पाहात राहातो ) गोष्टीला कुठून आरंभ करूं ?-मुंबईला आलों तिथपासून किं अगदीं पहिल्यापासून ?

**शशिः**—अगदीं पहिल्यापासून.

**मनहरः**—( धीमे धीमे ) ऐक तर. एक दिवशीं सकाळीं शेटनं मला उघ्राणं सारीं पाठवलं. मी गेलों त्या गांवांत एक दुसऱ्या गांवातला मास्तर राहात असे तो फार तंटेखोर होता—त्याच गांवच्या नाक्यावर सकाळीं सात वाजतां उघ्राणीला गेलों—दार बंद होतं. मी तें ठोकलं, कडी खडखडली पण जबाब मिळाला नाहीं. आंत गेलों, घरांत सामसूम दिसलं—त्या मास्तरची बायको रक्तबंबाळ होऊन अंथरुणांत मरून पडली होती. तिचा नवरा तिचा खून करून पळून गेला असावा असं मला वाटलं. ती मेलेली स्त्री निश्चेष्ट उघड्या डोळ्यांनीं माझ्याकडे पाहात होती. खून, पोलीस केस, हे सर्व विचार माझ्या डोळ्यांसमोर उभे राहातांच मी घाबरलो. पळून जाण्यासाठीं मागं फिरलों नि मला कुणाची हांक ऐकू आली !—' काका !' मला आश्चर्य वाटलं. मागें फिरलों. समोरच एक बालक उभं राहाण्याचा प्रयत्न करीत हंसत होतं. मला ' काका ' म्हणून हांक मारीत होतं.--

शशिः—( आसवं पुशीत असतां दोन्ही हातानीं मनहरचा एक हात उचलून ) ती मी ना ?

मनहरः—( रडवा आवाज स्थिर करून ) होय, शशी, मी तुला बोलावलं. तूं हंसलीस. पळून जाण्यासाठीं मी निघालों, तिनं झोळींतून हात लांब केले. माझे पाय उचलेनात ! बावरलों नि परत फिरलों. ती 'काका' म्हणून ओरडूं लागली—तुझं प्रफुल्ल मुखकमल खदखदां हंसूं लागलं. पळून जायला मन तयार झालं पण पळून जाणं झालं नाहीं. मी तुला घेतलं, छातीशीं कवटाळलं—नि तूं पुन्हां हंसलीस तिथं ठेवून जाण्याचा विचार केला—पण माझा जीव राहिला नाहीं. तुला घेऊन मी बाहेर पडलों.

शशिः—( स्वत.च्या हातानं मनहरचा हात दाबून ) काका !

मनहर—माझ्या पाकिटांत चार रुपये चौदा आण्याची उग्राणी जमली होती. मी तुला घेऊन पळत, सीमा सोडून सात गांव दूर स्टेशनकडे चाललों. रस्त्यांत एका गवळ्याकडून तुझ्यासाठीं दूध घेतलं. स्टेशनवर आल्यावर एका दुकानदाराला कोट विकून दीड रुपया घेतला नि मुंबईचं तिकीट काढलं—

शशिः—मग ?—

मनहरः—ट्रेनमधें सगळा वेळ तुझ्याशीं खेळून काढला. तूं नुसती हंसत होतीस —मुंबईला आल्यानंतरची हकिगत गुलाबदासनीं तुला सांगितली वाटतं. तुला भूक लागली नि पैसे तर संपलेले. एका दुधवाल्या भय्याला टोपी विकून तुला दूध पाजलं—

शशिः—My dearest Kaka !

मनहरः—गोष्ट पुरी झाली. गुलाबदासच्या मोठ्या भावानं तें पाहिलं—नि मला बोलावलं. त्यानं मला नोकरीला ठेवला नि पगारांत तुझं पालनपोषण करायची अट कबूल केली.

शशीः—मग ?—

मनहरः—मग काय ? मी भांडीं घांशीत असें, कपडे धूत असें, कन्याभाईला शाळेंत घेऊन जात असें नि मधूनमधून शिकत असें. रात्रीं तुला सांभाळीं—नि तूं माझ्या गळ्याला मिठी मारून झोपत होतीस!—

शशिः—( हात दाबून ) काका !—

**मनहर**:—( खोटं हंसून ) राहूं दे पुढली हकिकत ! मोटाभाई माझ्यावर खुश झाला नि पैसा देऊन माझ्याकडून फेरी करून घेऊं लागला. नंतर लक्ष्मी प्रसन्न झाली—नि आज आपण या—

**शशि**:—( आसवें पुसून ) पण काका, रुपयामागें माझ्या नांवावर चार आणे कां टाकीत गेलांत ? नि बापाच्या हिश्याची गोष्ट कां बनवलीत ?

**मनहर**:—शशी, याचा एकच मुद्दा होता. तूं पराधीन आहेस, निराधार आहेस, असं तुला वाटूं द्यायचं नव्हतं. ( खेदानें ) आपलं नातंगोतं कांहीं नाहीं. मोठी झाल्यावर तुला वाटेल, तूं लाचार आहेस—तुला असामान्य स्त्री बनवनि ही माझी महत्वाकांक्षा !—

**शशि**:—( स्नेहादरानें पाहूं लागते ) My fine old Kaka !

**मनहर**:—होय शशी ! आता म्हातारा झालों मी. चल, आतां तरी जाऊं देशील?

**शशि**:—नाहीं. अजून पुष्कळ विचारायचं आहे. बसा. उजाडायला वेळ आहे अजून. एवढा लोभ कां जडला माझ्यावर ? खरं सांगा. खोटं बोलाल तर तुमच्या शशीच्या रोमारोमांतून किडे पडतील.

**मनहर**:—शशी ! आणखी काय सांगूं ? मी एकटाच होतों—आईबापाविना, कुंटुंबाविया, संबंधीविना, माझ्या शेटचें दुकान तेंच माझं विश्व, जिव्हाळ्याचं असं कुणीच नव्हतं मला ! तूं हंसून माझ्याजवळ आलीस—त्या रखरखित ऐकलेपणांत मरत पडलेल्या मला—तूं आशेचा एक जलबिंदू भासलीस ! तुझा खेळ पाहून मी सुख मानलं. तुझे बोबडे बोल ऐकून मला श्रीमंत होण्याची हौस आली. तुझ्या हास्यानं माझं जीवन प्रफुल्ल झालं.—

**शशि**:—( उभी राहते. त्याच्याजवळ येते ) मग मला वेगळी कां काढलीत आतां ! नि माझा हिस्सा निराळा कां काढलात ?

**मनहर**:—( खेदानें ) मुली, तुला असामान्य स्त्री करायची होती ना ! तुला स्वातंत्र्य दिलं तरच तूं असामान्य व्हायला पूर्ण लायक ठरशील, म्हणून तुला स्वतंत्र केली. आतां कांहीं राहिलं सांगायचं ?

**शशि**:—( समोर उभी राहून मनहरचे कान ओढते ) तर मग

लबाड, लुच्चे, बुद्धे काका, अजूनपर्यंत अविवाहित कां राहिले ! बोला, जबाब द्या.

**मनहरः**—शशी, पुरे झालं आतां. मला आतां जास्त कांहीं नाहीं सांगायचं. तुला कुणी त्रास देऊं नये म्हणून मी लग्न केलं नाहीं. ( खोटं हंसून ) आतां करीन लग्न !

**शशिः**—आतां करीन लग्न ! न लग्न करून सांगाल कुणाला ? ( विनोदानें ) नवी पोरगी पाहून तिरस्कार वाटतो ! जुनी बाई पाहून हुडहुडी भरते ! होय ना ? तर मग या शशीलाच अशी तयार करूं, कीं नव्या अन् जुन्यापेक्षांही ती वरचढ ठरेल—नि तुमचा एकलेपणा दूर करील.

**मनहरः**—( डोळ्यावर हात ठेवून ) नाहीं—नाहीं—हें—काय—

**शशिः**—( समोर गुडघ्यावर बसून ) काका, आपण आतां किती दिवस ही आंधळी कोशिंबिर खेळायची ? ही शशी स्वच्छंदी आहे, फार पुढं गेली आहे, तिचा आत्मा नायकीणीचा आहे—हीं गांवाची ओवाळणी आहे—काका, काका, ती तुम्हांला एकटे सोडून नाहीं जाणार ! ( हात पुढें करून ) काका—

**मनहरः**—( वेदनाग्रस्ततेनें ) तूं काय बोलते आहेस ! भानावर आहेस का !

**शशिः**—चांगली भानावर आहें. आज दोन तासांत मी भानावर आलें. ( मनहरलाल जाऊं लागतो, त्याला अडवून ) काका, पुष्कळ झालं आता. माझ्याजवळ खोटं कां बोलतां ? ( खालीं पाहात ) काका—मला—मला काकी नाहीं करून घेणार ?

**मनहरः**—काय म्हणतोस ! शशी, हा चंद्र वेड लावतो आहे हें ! आतां आपण जास्त कांहींच बोलायचं नाहीं.

**शशिः**—आत्तांच ! ( हंसत ) मी काकी झाल्याखेरीज इथून उठतें का पहा !

**मनहरः**—( खालीं पाहात ) शशी, यावेळीं तूं उपकारवश झाली आहेस. कृतज्ञतेमुळं खेंचली जाते आहेस. आतां वाहिलेल्या शपथा जीवनभर टिकवणं—

**शशिः**—मी ' काका ' म्हणून हांक मारली नि तुम्ही मला घेऊन आलांत मी हंसलें नि तुम्ही मुंबईला आलां. रात्रीं तुमच्या गळ्याला मिठी मारून मी झोंपत असें नि तुम्ही पैसे मिळवीत होतां! आतां मी सांगतें आहें, मुकाट्यानं माझ्याशीं लग्न करा.

**मनहरः**—शशी, क्षणभराच्या आनंदानं जीवनभर असंतोष पसरेल असं कांहीं मला करायचं नाहीं. स्त्री–म्हणजे माझ्या जटेंत ठेवायची विशुद्ध नि नव्या उर्मीनी भरलेली माझी मंदाकिनी, असं मला वाटतं. तुझं म्हणणं, स्त्री म्हणजें चोहोबाजूला गिरक्या मारणारी सर्वांना नाचवणारी, चिखल उधळणारी, पाण्याचे तुषार फेकणारी गंगा. आपला मेळ कसा बसणार ?

**शशिः**—पण मी भागीरथी तरी ठरेन? तुम्ही पाठवाल तिथं जाईन, तुम्हांला प्रथम तारीन, नि नंतर शिल्लक राहिलें तर पतितपावन होईन.

**मनहरः**—शशी, खोटं कशाला बोलूं? मी स्वार्थी आहें. मला तूं हवी आहेस. आहेस अशीच–खुळीवेडी. पण माझ्यासाठीं, माझं जीवन सुखी करण्या-साठीं, माझं वेडेपण राखण्यासाठीं, माझा दुबळेपणा सांभाळण्यासाठीं–माझ्या-बरोबर हंसायला, रडायला, वाढायला,–म्हातारपणीं नर्मदेच्या नवऱ्याप्रमाणें तुझ्या डोक्यावर बसून फिरायला, माझ्या एकट्यासाठीं–माझी संसाराची भूक भागवायला, माझ्या एकलेपणाचा विसर पाडायला–

**शशिः**—( दोन्ही हातांत हात घालून ) मलाही दुसरं कुणी नको आहे. नि काका, मी हें सगळं करीन. पण न झालं, अपुरी पडलें, तर असा समज करून घेऊं नका, कीं जी शशि रडे, लाथ मारी, हंसे, तीच मूर्ख शशि ही! तिला पूर्वीप्रमाणंच, पटवून द्या, रिझवा नि नाहीं मानलं तिनं, तर–माझे काका, तुम्ही नाहीं तिचे कान पकडणार तर कोण?

**मनहरः**—माझी शशी! ( हात पुढें करतो )

**शशीः**—माझे काका!

( पडदा पडतो )

# पद्यावली.

## पद १ लें

शिवगौरी—

लाज न अणुभरी मनिं मम राहे !
प्रेम-पिपासा जीव न पाहे ॥ ध्रु० ॥
चंचल माया परवश काया ।
शंका सार्थी मार्गं पाहे ॥
या विरहाची खूण निराशा ।
विनया कां गणुं प्रेम दुरावें ॥ १ ॥

## पद २ रें

शशि—

कैसि निघेल संगरा । युवतिभाव भावना ।
कैसि रुचेल अंतरा । कुटिलकाम कामना ॥
कुणि न कां कुणा पुसे । निखिल जातिचें पिसें ।
वैरि बनेल आपुली । कुटिलकाम कामना ॥
कुणि कुठें कुणा वदे । कुणि सदा हंसे रडे ।
ऐसि हटेल जाहली । कुटिलकाम कामना ॥

## पद ३ रें

वैतालीय—

हा प्रेमळ रचना भास जना ।
जग काय अमीरी हें मानी ॥
ना यावें कां ? ना जावें कां ?
जग मस्तफकिरी हें मानी ॥
जरि संधि विकल करि जीवातें ।

परि परिहरिते जगिंचें नातें ।
कधिं कुसुमाची फुलवंती ये ।
कधिं रुदनाची रसवंती ये ।
मनिं मत्त सकल जग जैं पाहे ।
मग भान जिवाचे ना राहे ॥
कुणि घाय जिवाचे साहतसे ।
जग हाय ! तया पदिं हाणितसे ॥
कां राहि उगा । कां पाहि उगा ।
हृदयांगणिंची रमणी राणी ॥

## पद ४ थें

शशि—

कैसे कुणा पुसावें । जग हें अफाट साचें ।
झाला उदास जिव हा । मरणें जिणें कशाचें ॥
या सर्वही हंसा या । मज काय होय त्याचें ।
उडवा खुशाल मौजा । सारं हंसें सुखाचें ॥

## पद ५ वें

शिवगौरी—

तिळ तिळ तुटत तुटत मनिं राहिलें ।
अभिमान अवधान नच कांहिं दिसलें ॥
वनिं-विजनिं निरखिलें । मायाबलें ।
परि कांहीं प्रेमा-विरामामुळें ।
निशि-दिनिं जनिं-वनिं तुज ना फसलें ॥ १॥
नाहिं विहार हृदया परिहार ।
मान हानी झाली अपार ।
प्रेम केलें नाहिं मेलें ।
दान तूतें वाहिलें ॥ २ ॥

शिवगौरी:—

अगतिका आहली । बिचारी ।
कटुतरा जनाला दिसली ॥ धृ० ॥
प्रणय विकल भावना राहिना ।
अनुगत नरा सदा ।
विकल-मना । अनुगणना ।
झाली, करि केली ॥ १ ॥

शिवगौरी:—

नाहिं दिसत मज आस । या जगिं ।
काय कुणाला नाहिं दया ॥ धृ० ॥
जों जों विकसे मुकुल जगाचें ।
तों तों धडके हृदय सदाचें ।
काय करावें या प्रणया ॥ १ ॥

शशी—

धरि ताल चाल नाचे फुलवाली
नागिण डसली । नाहिं दिसली ।
विषवाली । ती नत झाली ॥ धृ ॥
आशा निमाली । निशा उदेली ।
आलि हंसुनिया । जाई रडुनिया ।
दाहक मादक विकार नटले ॥ १ ॥

शशी—

श्वेत छाया कौमुदीची प्रांगणीं या दाटली ।
थोर लाटा सागराच्या दृष्टि बघतां आटली ॥ धृ ॥
चांदणीही घेई झोके, चंद्र बघुनी थांबला ।
मानवाला ती निशीथीं प्रणय-लहरी वाटली